


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका






महाराष्ट्र राज्य साहित्य–संस्कृति-मंडळ पुरस्कृत
महाराष्ट्र साहित्य परिषदेचे मुखपत्र



# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

संपादक

डॉ. हेमंत विष्णु इनामदार



जानेवारी १९७९
ते
मार्च १९७९
अंक क्रमांक
२०८

मूल्य पाच रुपये

मुद्रक
श्री. चिंतामणी सदाशिव लाटकर
कल्पना मुद्रणालय, पुणे ३०

प्रकाशक
श्री. श्रीकृष्ण जनार्दन जोशी
कार्याध्यक्ष, म. सा. परिषद, पुणे ३०

अनुक्रमणिका



# अनुक्रमणिका



■

# संपादकीय

नदीच्या वाहत्या प्रवाहात आपण उभे राहिलो की, पायाखालची मऊसूत वाळू गुदगुल्या करीत बाजूला सरकत जाते; आणि पायाखाली एक छोटासा खड्डा पडत जातो. काळाच्या प्रवाहातही असंच काही घडत असतं. विशिष्ट मुदतीचं आपलं एखादं आवडतं काम करायला घेतलं की, त्याची मुदत सुरू झाली म्हणेतो ती संपतही येते. नंतरची पोकळी आपल्यापुरती जाणवू लागते.

साहित्य पत्रिकेची संपादकीय सूत्रं मित्रवर्य डॉ. भालचंद्र दिनकर फडके यांच्याकडून एप्रिल १९७६ मध्ये आम्ही स्वीकारली. आता एप्रिल १९७९ मध्ये ही जबाबदारी पुढच्या संपादकांच्या स्वाधीन करायची आहेत. गेल्या तीन वर्षांत ही सेवा आपण आपल्या कुवतीप्रमाणे, पणं मनापासून बजावली, याचं समाधान आहे. कर्तव्यपूर्तीची ही श्रीशिल्लक मोलाची आहे.

या ठिकाणी तीन वर्षांच्या संपादकीय कामगिरीचा हिशेब आपला आपणही मांडायला हरकत नाही. या मुदतीत ' शरच्चंद्र चटोपाध्याय जन्माशताब्दी विशेषांक ' (क्र. १९८) समृद्ध स्वरूपात काढता आला. ' वाङ्मयीन नियतकालिके : विद्यमान पर्व : समालोचनपर खास अंक (क्र. २००–२०१) सादर करता आला. साहित्य पत्रिकेच्या गेल्या अठ्ठेचाळीस वर्षांच्या वाटचालीतील (मार्च १९२८ ते मार्च १९७६) एकंदर पंधरा संपादकांपैकी बारा संपादकांच्या कामगिरीचा परामर्श घेणारे लेख प्रसिद्ध होऊ शकले. आठ अस्तंगत वाङ्मयीन नियतकालिके (विश्ववाणी, छंद, साहित्य, प्रतिभा, अभिरुचि, मुद्रा, आनंदवन व जिप्सी) कोणत्या तोलामोलाची होती, हे एका अंकात (क्र. १०२) मांडता आले. चिं. त्र्यं. खानोलकर, शरदबाबू, ग. त्र्यं. माडखोलकर, ग. दि. माडगूळकर, वि. द. घाटे व ना. सी. फडके यांच्या पावन स्मृतींना, छायाचित्रांकित/रेखाचित्रांकित मुखपृष्ठांसह श्रद्धांजली वाहण्यात आली.

डॉ. रा. चिं. ढेरे, डॉ. स. गं. मालशे, डॉ. भा. दि. फडके, डॉ. व. दि. कुलकर्णी, प्रा. स. शि. भावे, प्रा. गंगाधर गाडगीळ, डॉ. द. न. गोखले, डॉ. भीमराव कुलकर्णी, डॉ. वि. रा. करंदीकर, डॉ. मु. श्री. कानडे, डॉ. नि. जि. फडकुले, प्रा. वसंत आबाजी डहाके, प्रा. रमेश अ. तेंडुलकर, डॉ. वसंत स. जोशी, प्रा. गंगाधर पानतावणे, डॉ. गो. मा. पवार, प्रा. व. दा. कुलकर्णी, डॉ. सुरेश डोळके. प्रा. रा. भि.

अनुक्रमणिका

जोशी, डॉ. प्र. ल. गावडे, डॉ. गं. ना. जोगळेकर, डॉ. पंडित आवळीकर, डॉ. अनुराधा पोतदार, प्रा. म. ना. अदवंत, प्रा. गो. म. कुलकर्णी, डॉ. निशिकांत मिरजकर, डॉ. ल. रा. नसिराबादकर, प्राचार्य राम शेवाळकर, डॉ. सु. रा. चुनेकर, डॉ. वि. म. कुलकर्णी, डॉ. चंद्रशेखर बर्वे, डॉ. सं. सा. भोसले, प्रा. म. वा. धोंड प्रभृती मराठीच्या प्रथितयश प्राध्यापक-समीक्षकांचे लेखन प्रकाशित करता आले.

प्रा. विलास खोले, डॉ. शकुंतला आठवले, प्रा. उषा शिराळकर, डॉ. कांचनमाला हरमळकर, प्रा. वि. शं. चौघुले, प्रा. अंजली सोमण, डॉ. वि. भा. देशपांडे, प्रा. विद्याधर पु. गोखले, प्रा. ललिता कुंभोजकर, प्रा. रा. वि. डांगरे, डॉ. मीना भा. जोशी, प्रा. नंदा आपटे, प्रा. सुमेधा कुलकर्णी, प्रा. रवींद्र घवी, प्रा. अरुण प्रभुणे, डॉ. सुधाकर शं. देशपांडे, प्रा. मंदाकिनी खोले, प्रा. सुप्रिया अत्रे, डॉ. राम वि. मंत्री, प्रा. मनीषा दीक्षित, डॉ. श्रीलेखा साने, प्रा. श्यामला थडानी. प्रा. सुधा क्षीरे, प्राचार्य बलवंत देशमुख, प्रा. माधव ना. आचार्य, प्रा. अविनाश भडकमकर, प्रा. श्रीकांत तिडके, प्रा. विश्वास जहागिरदार, प्रा. विश्वास जाधव प्रभृती मराठीच्या, ताज्या दमाच्या व व्यासंगशील प्राध्यापकांचे अभ्यासपूर्ण लेखनसाहाय्य लाभले.

मराठीतर विषयांचे अध्यापन करणाऱ्या प्राध्यापकांनीही या तीन वर्षांत पत्रिकेसाठी लेखन केले. बॅ. पी जी. पाटील, डॉ. शांताराम जोग, प्रा. रंगनाथ पठारे, डॉ. सुरेश दलाल, डॉ. अशोक रा. केळकर, डॉ. चंद्रकांत बांदिवडेकर, डॉ. म. श्री. माटे, डॉ. अशोक प्र. कामत, डॉ. म. प. पेठे, प्रा. शां. ग. महाजन, डॉ. शांताराम भा. देव, डॉ. जगन्नाथ वा. जोशी, डॉ. रमेश बा. धोंगडे, प्रा. रावसाहेब कसबे, डॉ. कृ. ज्ञा. भिंगारकर, प्रा. दा. सी. देसाई, प्रा. माणिक कानेड प्रभृती सुहृदांचे पत्रिकेसाठी कसदार साहित्य प्रसिद्ध करता आले.

संशोधक व साहित्यिक म्हणून मान्यता पावलेल्या ग्रंथकारांनीही या मुदतीत पत्रिकेसाठी लिहिले आहे. डॉ. रा. चिं. ढेरे, प्रा. पु. ल. देशपांडे, डॉ. सुमती क्षेत्रमाडे, श्री. हरिश्चंद्र गुप्ता, डॉ. प्र. न. जोशी, प्रा. रा. ग. जाधव, श्री. कृ. मु. उजळंबकर, प्रा. रा. भि. जोशी, प्रा. वामन कृ. चोरघडे, श्री. मो. ज्ञा. शहाणे, प्रा. नी. शं. नवरे, श्री. बा. पु. कोल्हटकर प्रभृतींचा त्यामध्ये निर्देश करता येईल.

पत्रकार वा प्रकाशक म्हणून व्यवसाय करणाऱ्या काही मातबर मंडळींनी पत्रिकेसाठी उत्कृष्ट लेखनसाहाय्य केले आहे. श्री. वि. स. वाळिंबे, श्री. अनिरुद्ध अनंत कुलकर्णी, श्री. शंकर सारडा, श्री. राजेंद्र श्री. बनहट्टी, श्री. मनोहर महादेव केळकर, श्री. सुधाकर प्रभू, श्री. केशव वि. कोठावळे, कु. हेमलता अनंत अंतरकर, सौ. अनुराधा श्याम औरंगाबादकर, सौ. उषा दा. कुलकर्णी, सौ. सुमती पं. कुलकर्णी, श्री. वासू देशपांडे, श्री. आनंद माडगूळकर, श्री. श्रीधर माडगूळकर प्रभृतींचे लेखन या संदर्भात उल्लेखिता येईल.

अनुक्रमणिका

खुद्द साहित्य परिषदेच्या विद्यमान पदाधिकाऱ्यांचेच लेखनसाहाय्य ही या काळातील भाग्याची घटना आहे. श्री. श्री. ज. जोशी, श्री. वि. ग. कानिटकर, श्री. म. श्री. दीक्षित, डॉ. प्र. ल. गावडे, डॉ. अशोक प्र. कामत, डॉ. वसंत स. जोशी, डॉ. निर्मलकुमार जि. फडकुले, डॉ. वि. रा. करंदीकर, डॉ. वि. म. कुलकर्णी, प्रा. म. ना. अदवंत, डॉ. स. गं. मालशे प्रभृती पदाधिकारी आपापल्या ग्रंथकर्तृत्वाबद्दलही ख्यातनाम असून पत्रिकेसाठी त्यांनी गेल्या तीन वर्षांत वेळोवेळी लिहिले आहे.

ताज्या उमेदीच्या काही नव्या लेखकांनाही या साहित्य-साहाय्यात आपापला वाटा उचलला आहे. सौ. तारा पंडित (कलकत्ता), सौ. वसुंधरा पंडित (पुणे), सौ. शकुंतला जोग (नागपूर), श्रीमती शांता गोखले (मुंबई), श्री. मु. शं. देशपांडे (पुणे), श्री. वा. ल. मंजूळ (पुणे), डॉ. वि. य. कुलकर्णी (पुणे), डॉ. शकुंतला लिमये (पुणे), श्री. शरद के. साठे (डोंबिवली), श्री. मधुकर कुलकर्णी (पुणे), डॉ. आशा सावदेकर (नागपूर) ही नावे विशेष उल्लेखनीय आहेत.

गेल्या तीन वर्षांतील पत्रिकेतील लेखन शुद्ध स्वरूपात सिद्ध झाले, त्याचे श्रेय व्याकरणशास्त्रविशारद श्री. मो. रा. वाळंबे यांचे आहे. सर्वच अंकाची मांडणी व छपाई अतिशय देखणी झाली, ती केवळ कल्पना मुद्रणालयाचे संचालक श्री. चिंतामणी सदाशिव ऊर्फ अण्णासाहेब लाटकर यांच्या मुद्रण कौशल्याची व साहित्यप्रीतीची फलश्रुती होय. श्री. सुभाष अवचट (पुणे), श्री. मुकुंद तळवलकर (मुंबई), प्रा. देवीदास बागूल (पुणे), श्री. चिंतामणी स. लाटकर व श्री. पंडित अ. कुलकर्णी प्रभृती कलावंतांचे, कलाप्रेमिकांचे साहाय्य लाभल्यामुळे विविध अंकांची मुखपृष्ठे आकर्षक स्वरूपात सिद्ध होऊ शकली. श्री. श्री. ज. जोशी, श्री. वि. ग. कानिटकर, श्री. म. श्री. दीक्षित, श्री. मो. रा. वाळंबे, डॉ. प्र. ल. गावडे, डॉ. वसंत स. जोशी प्रभृती सहकाऱ्यांनी संपादनकार्यात विशेष आपलेपणाने मौलिक साहाय्य केले. परिषदवार्ता लिहून देण्याचे जोखमीचे व जिकिरीचे काम श्री. म. श्री. दीक्षितांनी वेळोवेळी तत्परतेने केले. परिषद-कार्यालय-प्रमुख श्री. जिवाजी व्यंकटेश देशपांडे व परिषदेच्या ग्रंथपाल सौ. इंदूताई गोखले यांनी विविध संदर्भ अचूकपणे पुरवले.

काही त्रुटी दूर करता आल्या नाहीत, याची मात्र रुखरुख आहे. पत्रिका तीन महिन्यांतून एकदा निघते, तुटीच्या अंदाजपत्रकामुळे पृष्ठसंख्या नेहमीच तुटपुंजी असते. त्या मानाने लेखकांनी आपणहून पाठवलेल्या लेखांची संख्या मोठी असते. साहजिकच लक्षणीय स्वरूपाचे काही साहित्य अप्रकाशित स्वरूपात साठत जाते; व शेवटी नाइलाजाने ते परत करावे लागते. तीच गोष्ट ग्रंथसमीक्षणांची. आपापल्या ग्रंथांवर पत्रिकेत अभिप्राय यावा अशी अनेक लेखकांची वा प्रकाशकांची मनोमन इच्छा असते. प्रथितयश समीक्षकांकडे ग्रंथ धाडला तर ते उलट टपाली स्वीकृती कळवतात आणि त्यानंतर स्मरणपत्रांना जाम उत्तरे धाडीत नाहीत. हे टाळण्यासाठी

अनुक्रमणिका

नवोदितांकडून अभिप्राय लिहून घेतला तर आपल्या ग्रंथास पुरेसा न्याय मिळाला नाही असे लेखकाला वाटते. या सगळ्या खटाटोपात ग्रंथपरीक्षण लांबणीवर पडते. त्यात पुन्हा स्थलसंकोचामुळे काही ग्रंथ अ-लक्षित राहतात व त्यांच्या कर्त्यांचा वा प्रकाशकांचा राग ओढवून घ्यावा लागतो.

—यावर एक उपाय म्हणून प्रस्तुत अंकात बऱ्याच ग्रंथांचा संक्षिप्त परिचय करून दिला आहे. एवढे करूनही काही चांगले ग्रंथ राहून गेले असले तरी यापुढे या दिशेने प्रयत्न करून पाहण्यासारखा आहे, असे वाटते.

## विद्यापीठीय मराठी विभाग

शिवाजी विद्यापीठात नव्याने मराठीचा स्वतंत्र विभाग सुरू होत असून त्यासाठी एक प्राध्यापक, एक प्रपाठक व दोन व्याख्याते यांची निवड झाली आहे, अशी आनंदवार्ता आहे. मुंबई विद्यापीठात डॉ. व. दि. कुलकर्णी यांना प्राध्यापक (व विभागप्रमुख) म्हणून पदोन्नती मिळाली आहे; आणि प्रा. कृ. श्री. अर्जुनवाडकर हे प्रपाठक म्हणून तेथे रुजू झाले आहेत. पुणे विद्यापीठात मराठीच्या प्रपाठकाची आणखी एक जागा लवकरच भरली जाणार आहे. नागपूर विद्यापीठात डॉ. द. भि. कुलकर्णी यांना प्रपाठक म्हणून पदोन्नती मिळाली असून, प्रा. यशवंत मनोहर यांची, व्याख्याते म्हणून निवड झाली आहे. मुंबईस ठाकरसी महिला विद्यापीठात डॉ. चंद्रकांत वर्तक हे मराठीचे प्रपाठक म्हणून गतवर्षी रुजू झाले आहेत. या सर्वच सुहृदांचे हे यश मराठीचा महिमा वाढविणारे आहे.

## परिषदेचे नवे पदाधिकारी

म. सा. परिषदेच्या त्रैवार्षिक निवडणुकांचे निकाल नुकतेच जाहीर झाले. प्रा. वसंत कानेटकर (अध्यक्ष), डॉ. वि. रा. करंदीकर (कार्याध्यक्ष), श्री. पु. शं. पतके (कोषाध्यक्ष) ही नवी व कार्यक्षम मंडळी परिषदेची प्रतिष्ठा वाढवतीलच. जुन्या कार्यकारी मंडळातील श्री. म. श्री. दीक्षित, प्रा. न. म. जोशी व प्रा. म. ना. अदवंत तिघे उभे होते; व बऱ्याच बहुमताने ते तिघेही पुन्हा निवडून आले आहेत.

प्रा. द. मा. मिरासदार, श्री. ग. ल. ठोकळ, डॉ. आनंद यादव, श्री. माधव कानिटकर, प्रा. वसंत मिरासदार, प्राचार्य राम शेवाळकर, डॉ. द. ता. भोसले श्री. दत्ता हलसगीकर, प्रा. ह. श्री. शेणोलीकर, डॉ. वसंत दीक्षित, प्रा. म. वि. फाटक, डॉ. वसंत सावंत प्रभृती निवडून आलेल्या नवागतांच्या साहित्यसेवेचा व कार्यकर्तृत्वाचा परिषदेच्या उत्कर्षासाठी उपयोग होईल. या सर्व स्नेहीजनांचे स्वागत व अभिनंदन!

आजवर केलेली पत्रिकेची सेवा 'न्यून ते परते, अधिक ते सरते' या न्यायाने वाचकांनी गोड मानून घ्यावी, अशी विनंती करून आमच्या संपादकीय लेखणीस आम्ही पूर्णविराम देतो.

पुणे, दि. ३० मार्च १९७९ — हे. वि. इनामदार

अनुक्रमणिका

# या अंकातील लेखक

---

१. डॉ. निशिकांत धोंडोपंत मिरजकर / १३–ए / ११ ओल्ड राजेंद्रनगर, नवी दिल्ली ११००६०
२. प्रा. विश्वास जहागिरदार / नूतन महाविद्यालय, सेलू, जिल्हा परभणी
३. श्री. कृ. शं. हिंगवे / ३८ विजयानगर कॉलनी, पुणे ४११०३०
४. प्रा. श्रीकृष्ण केशव क्षीरसागर / आरोग्य भवनामागे, पुणे विद्यापीठ, पुणे ४११००७
५. श्री. वामन रावजी ढवळे / १२६ डी, फणसवाडी, मुंबई ४०० ००२
६. श्री. सुधीर दिनकर वेडेकर / १२५९/२, जंगली महाराज रस्ता, पुणे ४११ ००४
७. डॉ. सुधाकर केशव भोसले / ' अस्मिता ', ७१२ गुरुवार पेठ, पुणे ४११ ००२
८. डॉ. शैलजा महेश्वर करंदीकर / ५१ तेजपाल स्कीम, मार्ग क्र. २, विलेपार्ले पूर्व मुंबई ४०००५७
९. डॉ. कृष्णाजी ज्ञानेश्वर भिंगारकर / ५३३, शनिवार पेठ, पुणे ४११ ०३०
१०. डॉ. सूर्यकांत रा. खांडेकर / ९८३ ए, खांडेकर गल्ली, शिवाजी पेठ, कोल्हापूर ४१६ ००२
११. डॉ. र. वि. हेरवाडकर / ' अनंत निवास ', ३३५ अ, सावरकर मार्ग, दादर मुंबई ४०० ०२८
१२. डॉ. हे. वि. इनामदार / ६०/१५ एरंडवणे, पुणे ४११००४

■

# वसंत बापटांची कविता

## निशिकांत धोंडोपंत मिरजकर

---

१९५२ मध्ये वसंत बापटांचा पहिला काव्यसंग्रह 'बिजली' प्रकाशित झाला; आणि त्यांचा शेवटचा काव्यसंग्रह (मालिकाकविता) 'मानसी' १९७७ मध्ये प्रकाशित झाला. एका कवीच्या, बरोबर पंचवीस वर्षांच्या रौप्यमहोत्सवी प्रवासाचा विकासपट रेखाटण्याचा प्रयत्न येथे करावयाचा आहे.

'बिजली'च्या प्रस्तावनेच्या प्रारंभीच कुसुमाग्रजांनी बापटांच्या पत्रातील एक वाक्य उद्‌धृत केले आहे, ते असेः "माझी कविता फारशी लोकप्रिय झालेली नाही व ती कोणत्याही अर्थाने युगप्रवर्तक, नवी इत्यादी नाही, ती कविता असली म्हणजे पुरे असे मी मानतो." आपल्या काव्यासंबंधीची कवीची स्वतःची धारणा समजून घेण्याच्या दृष्टीने कवीचा पंचवीस वर्षांपूर्वीचा हा उद्‌गार महत्त्वाचा आहे. त्यातील लोकप्रियतेच्या अभावाचा उल्लेख केवळ विनयामुळे आलेला आहे. कारण गेल्या पंचवीस वर्षांत सातत्याने लोकप्रियतेच्या प्रकाशात राहिलेल्या कवींपैकी बापट हे एक आहेत. कवीला युगप्रवर्तक बनण्याचा अथवा नवीनतेच्या ग्लॅमरचा हव्यास नाही, याची नोंद घेण्यासारखी आहे. परंतु त्यापेक्षाही महत्त्वाची गोष्ट म्हणजे आपल्या कवितेच्या 'कविता असण्याची' कवीला असलेली असोशी. तिच्या स्वाभाविकतेचे, सहजपणाचे, आत्मरत वृत्तीचे त्याच्या दृष्टीने असलेले प्राधान्य. "छंदात बोलण्याचा छंद मला मुळातच आहे." किंवा, "वयाच्या सहाव्या-सातव्या वर्षीच लयबद्ध रचनेचा चाळा माझ्या मनाने सुरू केला." ('सेतू' काव्यसंग्रहाच्या प्रारंभीची - भूमिका') यासारख्या आत्मनिवेदनातून आपल्या कवितानिर्मितीचे सहजस्वभाव, मूळ बापटांनी पुन्हा एकदा सांगितले. जाणीवपूर्वक घाटदार लेखन, प्रासयमकांचा हव्यास या टीकेचा प्रतिवाद करून "ही गोष्ट पूर्वसंस्कारामुळे आपोआपच घडते. माझ्यातील कवीच्या व्यक्तित्वाचा तो एक अच्छेद्य भाग झालेला आहे," अशी आपली बाजू मांडली. या सगळ्यामागे आपल्या कवितेच्या सहजप्रेरक रूपाला अधोरेखित करण्याचा आग्रह होता.

अनुक्रमणिका

आपल्या काव्यप्रवासाचे दोन टप्पे बापटांनी ' सेतू 'च्या ' भूमिके'मध्ये सविस्तर सांगितलेले आहेत. प्रारंभी, राजकीय आणि सामाजिक आंदोलनाचा अपरिहार्य परिणाम आपल्या व्यक्तिमत्त्वावर झाल्याचे ते सांगतात. त्या परिणामामुळे पुष्कळ वर्षे-पर्यंत आपली एकूण वाङ्मयविषयक दृष्टीच बदलून गेल्याची कबुली त्यांनी दिली आहे. जे समष्टीच्या भावनांचे प्रतिनिधित्व करते, लोककल्याणासाठी ज्याचा जन्म झाला आहे, जे निजलेल्यांना उठविते, उठलेल्यांना कार्यान्वित करते ते साहित्य, अशी त्यांची समजूत बनली होती. ' स्वान्तःसुखाय ' हे तत्त्व ' बहुजनहिताय ' ह्या तत्त्वाने झाकून टाकले, आणि त्यांच्याकडून प्रचारी साहित्याची निर्मिती झाली. परंतु नंतर त्यांनी जाणीवपूर्वक " प्रचारी साहित्याकडे पाठ फिरवली, निदान त्याची काव्यक्षेत्रा-तून हकालपट्टी केली. " परंतु " तरीही समाजाच्या सुखदुःखांकडे पाठ फिरविण्याची भूमिका घेणे मला जमणार नाही, रुचणार नाही....माझ्या काव्यात समाजाच्या आशानिराशांना फार मोठी जागा आहे आणि अजूनही राहील. " असा दावाही त्यांनी ठामपणाने केला आहे. ' केवळ सौंदर्य, केवळ आनंद ' ही आपल्या काव्य-विषयक जाणिवेतील फरक दाखविणारी पहिली कविता असल्याचे सांगून बापट म्हणतात, " परम आनंद हेच काव्याचे प्रयोजन आहे अशी माझी आता निष्ठा झाली आहे. त्यामुळे माझी जाणीव मुक्त झाली आहे...मी माझ्या अनुभूतीशी प्रामाणिक राहू शकतो. " आपल्या काव्याच्या आणि काव्यविषयक जाणिवेच्या स्वरूपाविषयी कवीने केलेली ही विधाने आणि प्रत्यक्ष त्याच्या काव्यामधून हाती येणारे निष्कर्ष यांचा ताळमेळ घालून पाहणे मनोरंजक ठरावे.

बापटांना जरी नावीन्यासाठी नावीन्याचा सोस नसला, तरी त्यांच्या कवितेत प्रथम-पासूनच नवीनता आणि परंपरा यांचा मधुर समन्वय झालेला आहे. काव्याच्या बाह्य रूपामध्ये जुन्या आणि नव्या विविध रचनाबंधांचा त्यांनी सारख्याच कुशलतेने आणि सहजतेने अवलंब केला आहे. तोच आशय मांडण्याच्या वेगवेगळ्या नवनवीन आविष्कारपद्धती त्यांनी परिणामकारपणे गुंफलेल्या आहेत आणि हा नव्याजुन्याचा समन्वय केवळ बाह्यांगापुरता किंवा रचनाबंधापुरता मर्यादित नाही. बापटांच्या काव्यानुभूतीमध्येही त्याचे सुभगरम्य दर्शन घडते. काही मोजकी उदाहरणे पाहण्या-सारखी आहेत. ' तू गर्भालस ' या कवितेत गर्भवतीच्या व्यक्तिरूपाचे चित्र बापट पुढील शब्दांत रेखाटतात :

" कुजबुजताना काकण हिरवे, उठती वाऱ्यावर लाटा
दुर्वावर जड पाउल पडता फुटती तीर्थांच्या वाटा
तुझ्याभोवती पंख लावुनी फिरती कोजागिरि रात्री
तू गर्भालस गौर केतकी धुंद धुके भरले नेत्री
मूर्तिमती तू पहाटपूजा गाभाऱ्यातिल तू समई

तूच फुलांची परडी झालिस फुले वेचता स्वप्नमयी."

गर्भवतीच्या व्यक्तिमत्त्वातील रमणीयता, शृंगाराची तृप्तफलित जाणीव, स्वप्नांची चाहूल, गूढता, सौंदर्य, पावित्र्य, शुचिता, समर्पणशीलता, पूज्यता या नानाविध पैलूंचे हे चित्र, या संकल्पनातील पारंपरिकता आणि नवकल्पना यांचा समन्वय फारच प्रभावीपणे साकार करताना दिसते. हिरव्या काकणांच्या कुजबुजीने वाऱ्यावर लाटा उठणे आणि पंख लावून भोवती फिरणाऱ्या कोजागिरी रात्री या नावीन्यपूर्ण प्रतिमांच्या जोडीनेच तीर्थांच्या वाटा, पहाटपूजा, गाभाऱ्यातील सनई ही परंपरागत रूपके नवा साज घेऊन आलेली आहेत. 'पिंपळ' या कवितेत हे जास्त जाणवते. सेवाग्रामला महात्माजींनी लावलेला पिंपळ आणि त्याशेजारी असलेली, कस्तुरबांनी लावलेली बकुळी या प्रतीकांच्या द्वारे या महनीय युगुलाविषयीची नितांत श्रद्धेची अनुभूती बापटांनी व्यक्त केलेली आहे. अशा तऱ्हेची श्रद्धा आणि तिचा प्रतीकरूप आविष्कार परंपरेशी जिव्हाळ्याचे नाते सांगत असतानाच, पिंपळाने कृशांगुलींनी कमळे कोरणे, आभाळाची निळी प्रार्थना मिटल्या नयनी पिऊन घेणे, कृशांगुलींच्या मुक्त समंधाने झपाटणे इत्यादी प्रतिमांच्या वाटेने काव्यानुभूतीचे नवे प्रवाह कवितेत प्रवेश करतात. 'हीरो'-सारख्या कवितेत सिनेक्षेत्रातील परिभाषेचा अत्यंत नावीन्यपूर्ण उपयोग करून सनातन प्रेमकथेचा आविष्कार करताना नाट्यगीताचा एक अनोखा ढंग बापट सादर करतात, तर—

"खुळे पाखरू...त्यास कळे ना
　　कोठे जावे...खाली ! वरती !
तिथे खुणावी निळे गगन तो
　　इथे खुणावी हिरवी धरती !"

असल्या उत्कट आत्मरत प्रतीकचित्रातून ऐंद्रीय आवाहन करीत 'श्रावणा'-सारख्या चिरपरिचित विषयावरील कवितेत सुंदर अनुभूतींचे नावीन्यपूर्ण आलेखन ते करताना दिसतात. नव्या विज्ञानाचे 'आदिरहस्य' प्रगट करताना विज्ञानाच्या विराट भविष्याचा देदीप्यमान चित्रपट मांडून झाल्यावर,

"सप्तग्रही फिरता फिरता प्रेमिकांना ओढ लागेल
नेपच्यूनकडला चंद्र पाहत गुरुवरचा कवी जागेल
एकटे कोणी राहणार नाही परार्धाच्या सूर्यावरती
'बहु स्याम्' म्हणत म्हणत गजबजेल पुन्हा धरती !"

असा परंपरेशी जिव्हाळ्याचा धागा जोडणारा भावुक आशावाद ते हळवेपणाने प्रगट करतात.

सामाजिक तत्त्वज्ञान आणि त्या तत्त्वज्ञानाचा आवेशाने मनापासून केलेला पुरस्कार हे 'बिजली' मधील बापटांच्या काव्याचे एक प्रमुख वैशिष्ट्य होते. 'बिजली' या

नावापासूनच याचे प्रत्यंतर सुरू होते. एक खरे, की अशा तऱ्हेचा सामाजिक आशय वापटांच्या त्या काळच्या प्रामाणिक धारणेतून अवतरलेला होता. सामाजिक जाणिवा आणि काव्यविषयक दृष्टी या दोन्ही बाबतींत ही धारणा प्रामाणिक होती. तिच्यात क्वचित प्रचारकी थाट असला, तरी तो प्रचार मनापासूनचा आणि कळकळीने केलेला होता. त्यात दिखाऊपणा अथवा उसना अभिनिवेश नव्हता. आंतरिक निष्ठा, भावनिक जिव्हाळा आणि तीव्र आत्मप्रत्यय यांनी वापटांचे सामाजिक तत्त्वज्ञान भिजलेले होते.

" या औतांतुन हातोड्यांतुन या जात्यांतुन या पात्यांतुन
या दात्यांतुन या भात्यांतुन या कामांतुन या घामांतुन
या अश्रूंतुन या अग्नीतुन ठिणगी फुटेल जोसात ! "

हा उदंड क्रांतिवाद भाबडा असला तरी मनापासूनचा आणि म्हणून उत्कट होता. 'देशाची हाक' सारख्या कवितेतूनच कवीच्या मनाची ठसठसणारी वेदना सरळ शैलीत व्यक्त होत होती. समतावादाच्या ध्येयाने झपाटलेले कवीचे मन समाजक्रांतीसाठी आसुसलेले होते. 'स्वातंत्र्य ! कुठे स्वातंत्र्य ?' असा विदारक प्रश्न खरोखरीच त्यांच्यापुढे उभा ठाकलेला होता. हळूहळू सामाजिक जाणिवांचा भाबडेपणा आणि परिणामतः ढोबळपणा कमी होऊ लागला. धगधगीत स्वप्नांना कवटाळून विसंगत वास्तवावर आगपाखड करण्याची वृत्ती ओसरू लागली. तथापि तथाकथित प्रतिष्ठित संभावितपणाचा तिरस्कार करणारा मनाला पडलेला पीळ कायम होता. काव्यगत परिपक्वतेच्या विकासानुषंगाने ऐंद्रीय संवेदनांच्या आवाहनाचे महत्त्व वाढू लागल्यावर या तिरस्काराचा रोख किंचित कलता झाला. 'दख्खनची राणी...' सारख्या कवितेतून, आपापल्या क्षुद्र प्रतिष्ठितपणाच्या कवचांत गुरफटून उन्मुक्त निसर्गसौंदर्याला पारखे होणाऱ्या उच्चवर्गीयांचा भेदक उपहास होऊ लागला. 'तेव्हा आणि आता' सारख्या कवितेत, सुधारलेल्या मानवाच्या ढोंगी वृत्तींचे रोकडे चित्रण येऊ लागले. 'एक डोळा आणि एक डोळा' या कवितेत तर सामाजिक प्रेरणांचा आविष्कार संवेदनांच्या वाटेनेच अत्यंत प्रभावीपणे आणि स्वाभाविकपणे झालेला आहे. प्रौढ (mature) बनलेली वापटांची काव्यप्रतिभा सामाजिक प्रेरणांचा जुना धागा तेथे अतिशय विकसित आणि परिणामकारक आकृतिबंधात गुंफताना दिसते. कोणाला तरी काहीतरी सांगण्यासाठी, आवाहन करण्यासाठी, चेतना देण्यासाठी ही कविता आता धडपडत नाही. तिचा आविष्काराचा प्रवाह आता मनाच्या गाभ्यातून शब्दांच्या पृष्ठभागाकडे वाहताना दिसून येतो. 'सकीना' मधील कवितांत सामाजिक जाणिवेचा हा उत्कट आविष्कार आत्मरत अनुभूतीतून साकार झालेला दिसतो.

" किती सहज मणक्यामधले फुटून जातात मणी
किती सहज रक्तामधली मळली जाते कणी. " किंवा

" किती सहज नवे मानव जन्मा आलो आहोत
तीन ताड पूर्वजांचे पुत्र तीन फुटी ! "

—यासारख्या उद्‌गारात सामाजिक विपरीतदर्शनातून उद्‌भवलेला अंतःकरणाचा कडवट प्रत्यय शब्दबद्ध झालेला आहे. सामाजिक क्रांतीची चाहूल अजूनही कवीच्या संवेदनाक्षम मनाला जाणवते. पण आता तिच्यात भाबडेपणाचा सीधासरळ मामला नाही. कडवटपणा व तीव्रता असली, तरी समजुतदार प्रौढपणा आहे. ' जंगल '-सारख्या कवितेतून त्याचे रूप लक्षात येते. आता आविष्काराला प्रत्यक्ष आवाहनाचे रूप मिळाले, तरी त्यात प्रचाराच्या अभिनिवेशाऐवजी काव्यानुभूतीच्या तीव्रतेचे प्रतीकादींच्या साहाय्याने घडणारे भेदक शब्दांकन पाहावयास मिळते.

" उठा नागड्यांनो ! तुम्हांला न भीती, कधीचीच अब्रू असे फुंकली...
वृथा शिष्ट संभावितांची तमा का ? कुले खाजवा दाखवा वाकुली
कुणी संस्कृतीचा धरी आड पंचा नको तेथ आहे जरी फाटला
असे कोरडा मंत्र त्यांचा मुखींचा, झरा अंतरीचा पुरा आटला. "

हे ' शेवटची लढाई ' मधील आवाहन याच प्रकारचे आहे. दयनीय जिण्याच्या सहानुभूतिपूर्ण निरीक्षणातून प्रगटलेला हा आत्मोद्‌गारच आहे. त्यात क्रांतीची हाक असली, तरी कविता केल्यामुळे ती क्रांती जवळ येईल, असला भाबडा आत्मविश्वास नाही.

" बिजलीतून व्यक्त होणारी जीवनदृष्टी प्रागतिक, व्यापक आणि सहानुभूतिमय आहे. " असे मत पंचवीस वर्षांपूर्वी कुसुमाग्रजांनी व्यक्त केलेले होते. बापटांच्या काव्याची प्रमुख प्रेरणा आणि त्याचे सामर्थ्य या जीवनदृष्टीमध्येच असल्याचा त्यांचा दावा होता. एका अर्थाने तो सयुक्तिक होता " माझी हौसच वेगळी, मज हवी विद्युल्लतेची फुले " अशी आपल्या कवितासखीची कामना बापटांनीही कौतुकाने वर्णन केलेली होती.

" ऐशी ती नटली, कसून तिजला मीही तदा भेटलो;
तेव्हा मी जळलो, अजून जळतो, मी अमृते पेटलो. "

असा त्यांचा कवितासखीच्या आलिंगनाचा अनुभव होता. कवीच्या या समर्थ जीवनदृष्टीमुळेच ' सदैव सैनिका पुढेच जायचे ' सारख्या कवितांना चिरकालीन आवाहकता प्राप्त होऊ शकली. त्यातील सैनिकाच्या प्रवासातील उत्पातांचे प्रतीकात्मक चित्र आणि भव्य ईप्सिताचे स्वप्न साकार होईपर्यंत न थांबण्याचा कठोर निर्धार यांना वेगवेगळ्या काळांत वेगवेगळे संदर्भार्थ प्राप्त होऊन सदैव ताजेपणाची कवचकुंडले लाभली आहेत. प्रासंगिक प्रचारकी उद्दिष्टापेक्षा विजिगीषु जीवनदृष्टीचा असलेला प्रभाव हेच त्याचे कारण आहे. ' सोनापुरच्या भिंतीवरती ' सारख्या कवितेत साध्या अनुभवातून झेपावणारे तत्त्वचिंतनही याच जीवनदृष्टीच्या प्रभावातून झालेले होते. पुढे

या जीवनदृष्टीला ऐंद्रीय संवेदनांच्या उत्कटतेचे धुमारे फुटले. ' समाधी 'सारख्या कवितेत या समृद्धतेचे आर्त चित्रण आढळते, तर या नव्या समृद्धीच्या लेण्यातून अविच्छिन्न राहिलेला आणि अधिक सुजाण बनलेला मूळचा रूपविलास ' व्यभिचार'-सारख्या कवितेत—

" ...जळो चिवट सौभाग्य
वर वर उपचार
बरा जिवट दुर्घट
जातिवंत व्यभिचार. "

अशा नव्या प्रतीकातून ठसठशीतपणे प्रगट होतो.

सामाजिक जाणिवा काय, अथवा व्यक्तिगत जीवनानुभव काय, बापटांना नाट्याचे प्रथमपासून आकर्षण आहे. नाट्याचा अनुभव घेण्यासाठी आणि तो अभिव्यक्त करण्यासाठी जीवनानुभवाची रचना ते परस्परविरोधी दोन पातळ्यांवर करून विरोधलयीत तो सादर करतात. ' हे चित्र आणि ते चित्र ' अशा थाटाची अनुभवांची शृंखला ' बिजली ' पासून ' सकीना 'पर्यंत वेगवेगळ्या अनुभवांच्या आविष्करणात सातत्याने आणि परिणामकारक स्वरूपात आढळते. भरधाव धावणाऱ्या जांभळ्या मोटारीत बसून जाणारी बाहुली आणि रानातल्या वाटेने काटे तुडवून फाटणारे रंकाचे पाय, उन्हाळा आल्यावर वाळ्याचे पडदे लावून झळीचे नावही उरू न देणे आणि रंकाला मात्र बाभळीचे छत्र, थंडीत लोकरीचे कपडे व हुक्क्यावर फुंकर घालायला नोकर, आणि रंकाला मात्र नेसायला लक्तर व झोपायला फत्तर, चांदीच्या ताटात मिठाईचे जेवण व रंकाला मातीच्या मडक्यात किडकी जवार, असा ढोबळ परंतु धगधगीत विरोध बापटांनी सुरुवातीच्या कवितांत वर्णन करून नाट्याविष्कार केला. पुढे पुढे ' स्वातंत्र्य ! कुठे स्वातंत्र्य ? ' सारख्या कवितेत असे विरोधचित्रण एका व्यापक भावानुभवाचे उपांग बनले आणि त्यातील ढोबळपणा थोडा कमी झाला.

" रेशमी विणावी साडी शंभर रोज
परि घरधनिणीचे नेसू लाजिरवाणे. "

यासारखे विरोधी चित्रदर्शन किंवा " हा बळिराजा ?...छे...राजबळी " अशी शाब्दिक विरोधचमत्कृती किंवा डर्बीत धावणाऱ्या अर्ध्या लाखाच्या सुंदर अबलख घोड्याचे कौतुक वर्णन करता करता—

" आं ! पिकली नाहित शेते ?...धान्यच नाही ?
हे लबाड खेडुत हवा तयांना जोडा. "

—असे विरोधी वक्तव्य यांचा संबंध स्वातंत्र्याच्या वैयर्थ्याच्या मूलभूत व्यापक भावानुभवाशी असल्यामुळे येथील नाट्य एका परिणामकारक आकृतिबंधाची उभारणी करते. ज्याच्या बागेमध्ये तऱ्हेतऱ्हेची सुगंधी फुले आपले सुगंधवैभव उधळत आहेत

अशा नगरशेटीच्या दिवाणखान्यात स्फटिकधवल काचपात्रामध्ये कागदी फुले ठेवलेली असणे (' दक्षिण दिशेला '), वातावरणात कोलाहल व दाही दिशांत हला-हल भरलेले असताना पाषाणाच्या छाताडावर हिरव्या पिंपळपानाने आपले अक्षय गान गात राहणे (' खडकावरले पिंपळपान ') अशा विरोधलयीतील प्रतीकचित्रांच्या साहाय्याने काव्यानुभवाचे आकृतिबंध रचणे बापटांच्या प्रतिभेला फार आवडते. एवढेच नव्हे, तर प्रीतीचा अनुभवही नाट्यपूर्ण विरोधलयीच्या आश्रयानेच ते बऱ्याच वेळा परिणामकारक रीतीने सादर करतात.

" वेदान्ताच्या उद्घोषात
तुझे काढतो मी चित्र
आणि तुझ्या संगतीत
बोले वेदान्त परत्र " (' समजावणी ')

" एका वेड्या शहाण्याची
प्रज्ञा होते वेडीपिशी
एका शहाण्या वेडीची
तृप्त होते कासाविशी. " (' कोडे ')

" वैशाखाच्या उन्हात फिरते पौर्णातिल यामिनी
मनामनाला वणवा लावी शीतळ सौदामिनी "
(' लावणी – शीतळ सौदामिनीची ')

" तुझ्यापाशी दिवा माझ्यापाशी रात्र
तरी गात्रगात्र अंधारले !
तुझ्यापाशी मेघ माझ्यापाशी चोच
तरी असतोच तहानेला ! " ( तुझ्यापाशी दिवा ')

—अशी वेगवेगळ्या प्रणयानुभवाच्या छटा व्यक्त करणारी कितीतरी विरोधचित्रे बापटांच्या कवितेत इतस्ततः विखुरलेली आहेत. ' भर दुपारच्या उन्हात फिरणारी चांदणी रैना ' त्यांच्या प्रणयिनीचे रूपविभ्रम नाट्यमय रीतीने व्यक्त करते. पाकळ्या तोडल्यावर त्यांच्या पुन्हा कळ्या कशा होतील असा प्रश्न ते भग्नाशा जागृत करू पाहणाऱ्या प्रणयिनीला विचारतात. ' सर्वांसाठी आणि सर्वदा ' अक्षय सदाफुलीचे हसू आणि लाडिकवाणे अल्लड भाषण असताना, ' फक्त तुझ्यास्तव आणि तुझ्या-स्तव ' एकांतीचा एकच आसू आणि एकांतीचे अबोल गाणे असल्याचा ' संकेत ' ते आपल्या प्रणयिनीपाशी व्यक्त करतात.

कल्पकता—फँटसी—हा बापटांच्या कवितेचा एक प्रभावी गुणविशेष आहे. व्यक्तिगत उत्कट अनुभवात बुडून जाताना आणि बहिर्मुख वृत्तीने सामाजिक जाणिवांना सामोरे जाताना बापट कल्पनारंजनाच्या नागमोडी वाटेने डौलदार चालीने चालत जातात.

"आणि पहाटे खिडकीमधुनी
चंद्रहि आला थकूनभागुन
कलंडुनी माझ्याच उशीवर
तोही नकळत झोपी गेला."

अशा रमणीय कल्पनारंजनाच्या आधारे 'शांती' राजकन्येच्या स्वयंवरात दोन्ही हात गमावलेल्या दुर्दैवी भारताचे दृश्य असणारे 'पहाटेचे स्वप्न' त्यांनी पंचवीस वर्षांपूर्वी पाहिले होते. त्यानंतर—

"नुक्ते झाले स्नान हिचे ते राजविलासी
आठ बिचाऱ्या न्हाऊ घालित होत्या दासी
निरखित अपुली आपण कांती आरस्पानी
थबकुन उठली चाहुल भलती येता कानी"

—अशी शरदामधली तरणीताठी पहाट मीलनसमयीच्या प्रणयिनीचे प्रतीक बनून एका हरवलेल्या उत्कट अनुभवासाठी 'सेतू' बनताना त्यांनी पाहिली. मिलनाच्या उत्कट आवेगामुळे बाह्य परिवेषादी उपचारांची 'विस्मृती' कशी झाली, याचे कल्पनारम्य विद्रुतचित्र त्यांनी सादर केले. कवीच्या रुक्ष तळव्यांवर प्रियेने बीज पेरल्यावर नसांची वेल आणि रक्ताची फुले बनली. ('हात'). गर्भवतीच्या व्यक्तिमत्त्वाचे चित्र रेखताना तिचे पाऊल दूर्वांवर पडताच तीर्थांच्या वाटा फुटल्याचे आणि तिच्याभोवती कोजागिरीच्या रात्री पंख लावून फिरत असल्याचे त्यांना जाणवले. ('तू गर्भालस'), सोनेरी स्वप्नफुलांच्या कवीच्या रुपेरी बागेत धुक्याच्या अंधुक वाटेवर चंदेरी कापुरकणांची पखरण झाली. ('बाग'). चित्राच्या छत्रीमधून चित्र बनून लगबगा जाणारी मनकर्णिका ('लावणी-मुंबईच्या मनकर्णिकेची'), सकाळच्या उन्हासरसे दिसेल त्या आकाराला सोन्याचे हात देणारा आणि टिंबाटिंबांमधे आपले बिंब भरून ठेवणारा कुमार ('एका कुमाराची कहाणी'), रुपेरी पंखांवर फूत्कारत उडणाऱ्या पिवळ्याधमक नागिणी ('मांडूची रात्र'), लक्षस्तनी राक्षसीच्या लांबलांब उंचउंच टांगा ('पत्र') अशी विविध छटांची आणि व्यक्तिमत्त्वांची फँटसीची रूपे विविध स्तरांवरचे अनुभव प्रगट करताना बापटांच्या कवितेत येत राहिली. 'बिजली'पासून 'मानसी' पर्यंत हे फँटसीचे आकर्षण कायमच आहे, तिचा आविष्कार मात्र जास्तजास्त तरल, गूढ, अनेकपदरी आणि प्रतिमांकित होत गेलेला आहे.

बापटांच्या उत्कट संवेदनशीलतेमुळे त्यांच्या अलंकारांतून सहजपणेच प्रतिमांची निर्मिती होत गेली.

" ते हिरवे पर्वत मागे
वर चुळबुळणारी वाट
चंद्रातुन चंदन खिरते."

—यासारखे निसर्गसौंदर्याचे अपूप कविवृत्तीच्या उत्कट संवेदनांचा प्रत्यय घडविते आणि अबोध भावनांना साकार करते.

" वळवासाठी उत्सुक झाले
माझे वैशाखाचे अंतर
तरीच माझ्या क्षितिजावरती
इंद्रधनूचा फुटतो अंकुर..."

—यासारख्या अनुभूतिचित्रातील रूपके एक निसर्गप्रतिमा साकार करतात. सौंदर्य, उत्कटता आणि अनुभूतीचा खरेपणा यांचा प्रत्यय अशा प्रतिमेतून येत असतो. 'क्षणभर या सौधावर 'सारख्या नाट्यगीतात हरपलेल्या प्रीतीच्या क्षणिक पुनः- प्रत्ययाची ओढ व्यक्त करताना एक पुराणा विषय—

" तम केवळ बोलू दे
ताऱ्यांच्या अक्षरांत
बुडला बघ घट माझा
अंधाऱ्या सागरात. "

—अशा प्रतिमांच्या भाषेत सादर केला जातो आणि अधिकच हळवेपणाने समोर येतो. पाषाणाचे बळ असणारे अबोलीचे ओठ, ठाव न लागणारा काचेचा तलाव, आषाढघनांच्या धारांत यमुना भराला आलेली असताना निद्रित गोपाच्या निष्ठुर करांत पडून राहिलेली विभिस्त राधा, करांच्या अग्रभागी असलेल्या मखमलीच्या लेखणीने कोरलेली देखणी अंधारलेणी, चंद्रकोरीसारखे कोवळे हसणे, करपल्लवीला असलेला अशोकपानांचा नाजूक वसंती रंग, आंधळ्या अंधारात शिळंधार पडणारा सुयांचा पाऊस, क्षणाक्षणांच्या ताणलेल्या दोरीवरचा भिवईभिवईचा झुला...अशा अनेकानेक प्रतिमांतून प्रीतीच्या अनुभूतीच्या नानाविध छटा बापटांनी अशा नजाक- तीने सादर केलेल्या आहेत की, निवेदनाच्या अथवा स्पष्टीकरणाच्या अतीत असलेली अनुभूती त्यातून उत्कटपणे उलगडत जाते. अर्थाचे अनेक पदर संवेदनांच्या रेशीम गोफात गुंतले—गुंतवले जातात आणि भाववृत्तीचा पीळ व्यक्त करतात.

" क्षणाक्षणांची ताणलेली दोरी, श्वासाश्वासांचा फास
उभे आयुष्य हा बळी जाणाऱ्याचा अखेरचा उरलेला तास!"

किंवा, " उभय तीर तर हुकले आता
वाट उरे आवर्तामधली
कशास आता दुबळा झगडा

अर्धांमुर्धी घटिका उरली ''

यासारख्या आयुष्याच्या अखेरीची खेच जाणवून देणारा जिवाच्या कुरवंडीचा क्षण असो, अथवा—

" प्राशिला सुखे कृष्णप्याला
तो भिनला भिनला भिनला. ''

असा बेहोष धुंदीचा बेपर्वा वादळी अनुभव असो,

" काही क्षण अधिक आले
काही काही वजा केले
हातचा एक हवा होता
तेवढे मात्र राहून गेले ! ''

—अशी मनाला डहुळणारी आर्त हुरहूर असो, अथवा,

" या शिखराची
त्या शिखराला बांग
पुन्हा झोपते
कुशी बदलुनी रांग.''

—अशी प्रत्ययकारी वातावरणनिर्मिती असो, बापटांची प्रतिमासृष्टी मोहक आणि जिवंत आकार धारण करीत त्यांच्या कवितेला समृद्ध बनवत गेली आहे. पुन्हा ही प्रतिमासृष्टी केवळ एकदेशीय अथवा केवळ रमणीय आहे असेही नाही. तिचे स्वरूप उत्तरोत्तर बहुपिंडी होत गेलेले आहे: खिडकीचा फडफडणारा डोळा, मनाच्या जखमांभोवती फिरणारे स्मृतींचे गिधाडपंख, वाढत्या अंधारधारेच्या पुरात सोडलेले निःश्वास दीप, काळोख्या वाटेत उमटलेले नाजूक कुंकुमठसे, उत्तररात्री मोडक्या मनी आसरा देणारी पिशाचे, तारांविना वीणेवर छेडलेला स्वर, पापणीवर नाचणारे मोर, सायलीच्या उरी झालेली मृगाची पेरणी, थरथरत्या काळजांच्या टिपणाला टपलेले टिपक्या-टिपक्यांचे महाकाय विवळे...अशी विविध स्तरांवरील विविध अर्थाकार धारण करणारी प्रतिमाने बापटांच्या कवितेत येतात. सौंदर्यपिपासू संवेदनशीलता, रम्य कल्पनामय भावपूर्ण निसर्गचित्रे, सामाजिक अभिनिवेश, अनेकपदरी अर्थपूर्णता या सगळ्यांचे स्रोत बापटांच्या प्रतिमांतून त्या त्या ठिकाणी पाझरलेले दिसतात. ' मानसी ' मध्ये तर या प्रतिमासमृद्धीच्या सामर्थ्याचा परमोच्च उत्कर्ष झालेला अर्थातच पाहावयास सापडतो.

" सर्वांना नकळत पोथीच्या प्रत्येक पानात
मी तुला पाकळीसारखी डकवलेली असते. ''

" स्वागत करण्यापुरते जवळ हासू नव्हते.
आसू तरी हुकमासरशी येतात कुठे !
मधली स्थिती
म्हणजे एक थबकलेली प्रलयलाट ! "

" तरीदेखील पापणीपापणी पावसामधे
उंच उंच मनोरेही बुडून गेले
आता लख्ख ऊन पडो आभाळभरून
बुडालेले गाव पुन्हा उगवत नाही. "

" त्या रात्री
समुद्र आणि चांदण्याची
वादळमिठी पडली. "

—ही वानगीदाखल उदाहरणे पुरेशी होतील. व्यवहारी शहाणपणाचा मुखवटा मिरवताना मनाशी जपलेली 'तिची' हळवी सुगंधित आठवण, फारा दिवसांनी झालेल्या भेटीच्या वेळची अनाकलनीय प्रक्षुब्ध मनःस्थिती, हरवलेल्या स्वप्नांचा सोशीकपणे बुडवून टाकणारा निर्धार आणि प्रमत्त प्रणयाची उधाणलेली स्मृती यांची ही प्रतिमाचित्रे शब्दांपलीकडल्या अनुभूतीला शब्दांच्या वाटेने शोधत जाताना दिसतात.

बापटांच्या आदर्शलक्षी तत्त्वचिंतनाला छेदून जाणारी ऐंद्रीय उत्कटतेची ओढ 'केवळ सौंदर्य, केवळ आनंद' या कवितेत पहिल्यांदा व्यक्त झाली; आणि पाच राजहंसांनी आनंदमयात उंच उचललेली कवीची पालखी ऐंद्रीय अनुभूतीच्या मुसाफिरीमध्ये हिंडतच राहिली. भावोत्कटतेची शारीर उत्कट चित्रे धीटपणाने आणि हळूहळू मत्तपणाने बापटांच्या कवितेतून प्रगट होऊ लागली. राष्ट्रीय आणि सामाजिक ध्येयवादाची खिलत वाटणाऱ्या फकिराला आपल्या हातच्या कमंडलूहून उजू कमंडलूवर डुलणाऱ्या नागिणीला पाहून फिर्याद स्फुरू लागली. शरदामधल्या पहाटेने सोनेरी वस्त्र वक्षापाशी सावरणाऱ्या विवस्त्र तरुणीचे रूप धारण केले. मिलनाच्या बेभान अनुभूतीचे आलेखन कवितेत उत्कटपणे होऊ लागले.

" फितूर झाला वारा आम्हा
पार उडाला तट जास्वंदी
कसे राखतिल बालेकिल्ले
तलम तुझे हे स्वारशिबंदी "

—असा शारीर आसक्तीचा आविष्कार खुलेपणाने होऊ लागला. रक्ताच्या सहज इशाऱ्यांमुळे घडणारे पाप निष्पापच आहे, अशी ग्वाही मनात उमटली. शारीर छटा

आणि शरीरातील प्रेममिलनाच्या विविध उत्कट छटा 'निर्चित'सारख्या कवितेत एकत्रपणे व्यक्त झाल्या. रामनाम घेताघेता मदनाने झपाटल्यावर पुरंध्रींची वदने आरतीत पाहावीत ('आज कळे), गोऱ्याभुऱ्या चांदण्यात 'तिची' गोरी काया पाहिल्यावर काळ्या मनी तिची गोरी छाया पडावी (गोरी), नवतीची नवलसुगी उधळून जाणाऱ्या षोडशवर्षेने कर्मठपणाला पल्लवित करावे ('वय वर्षे सोळा'), तिची घमघमलेली काया विजेच्या खांबाला टेकताच त्याच्यावरही नवलफुलांची नवखी भरती सरसरून यावी ('खांब!'), काचोळीला झालेली सख्त सजा पाहून भल्याभल्यांच्या नजरा तिला झोंबाव्यात ('लावणी—अबोलीची') इत्यादी उन्मुक्त शारीर आकर्षणाच्या अनुभूती बापटांच्या कवितेने उन्मुक्तपणाने व्यक्त केल्या. एकंदरच भौतिक अनुभूतीची ओढ शारीरिक प्रणयाच्या रूपातून प्रगट होऊ लागली. स्पर्शगंधादी संवेदनांच्या आवाहनाची परिसीमा स्त्रीत्वाच्या रूपाने प्रगट होऊ लागली. कधी लावणीच्या उत्तान शृंगाराचा रूपबंध, तर कधी गूढ प्रतीकांची भाषा त्यासाटी उपयोगात येऊ लागली.

स्त्रीच्या रूपविभ्रमांची आणि व्यक्तिमत्त्वाची लोभस सुंदर चित्रे गुंफणे हा बापटांच्या कवितेचा छंद बनला. अंगाला बिलगलेला सैल लहंगा, पैजाम्याचे फुलारलेले पंख मानेवर खुलणारे कमालखानी हार, पाठीवर लाडेलाडे रुमझुम झुलणारे रेशिमगोंडे, कटिवर पट्टा, उरी दुपट्टा, अशा थाटातील नवयौवना ('सकीना'), नव्या भराला आलेली आणि पहिल्या मेघाच्या स्पर्शाने रसावलेली सायली (सायली), चंचल अंचल सावरत, शृंगाराचा निराळाच बाज करून मोहिमेवर निघालेली अभिसारिका ('निराळा'), कालपरवापर्यंत परकरचोळीमधली पोर असलेली आणि झर्कन फूलटपोर झालेली नाचणनजरी छिंटछिचोर ('लावणी इबलीची') अशी विविधतापूर्ण रमणीय रमणीचित्रे बापटांच्या कवितेने रेखाटली. 'नानसी' मध्ये आपल्या प्रणयिनीचे विखुरलेले परंतु समृद्ध व्यक्तिचित्र कवीने तरल रंगांत रंगवले आहे. कवीच्या सगळ्याच कविता तिच्यामुळे आणि तिच्यासाठी आहेत. तिचे डोळे हसरे आहेत. केस भुरके आहेत. लहानपणी आवडीचा असणारा आंधळी कोशिंबिरीचा खेळ ती कवीच्या जीवनाशी वेगवेगळ्या अर्थांनी खेळत आलेली आहे. वर्षवर्ष हरवण्याचा गुण तिच्यात आहे. पण येते तेव्हा एखाद्या ग्रीक पुतळीसारखी उत्कट देहस्विनी होऊन आणि डोळ्यांत मृगजळाची जादू घेऊन ती येते. विद्वज्जड पांडित्यपूर्णतेने जोपासलेल्या प्रतिष्ठितपणाला अल्लडतेचा छंद देण्याचे निरागस सामर्थ्य तिच्यात आहे.

" वालावलीच्या कुळागरात
सायंकाळची रडली होतीस
त्या वेळी चुंफलेल्या लाल डोळ्यांचे गुलाब
तू आता केसांमध्ये माळतेस. "

अनुक्रमणिका

" एकाएकी विजेपेक्षा वीज झालीस
आंगभर कोसळलीस, बेहोषीत. "

" वर्मी घायाळ झालेल्या फुलचिमणीसारखी
माझ्या अपुऱ्या ओंजळीत
थरथरत कोसळलीस. "

" थुईथुई नाचणारे तुझे डोळे
एकाएकी डोहापेक्षा डोह झाले. "

ही तिच्या भावविभ्रमाची काही दृश्ये तिच्या भाववृत्तींची उत्कटता आणि सच्चेपणा, दाहकता आणि बेहोषी, विव्हलता आणि नाजूकपणा, प्रसन्नता आणि गूढता यांचे डौलदार आलेख सादर करतात.

' नाट्यगीत ' हा बापटांचा अतिशय लाडका प्रांत आहे. अनुभूतीमधील नाट्यपूर्ण क्षणांचेच त्यांना विलक्षण आकर्षण आहे. ' वरी केली झाकापाक ! ', ' सांग शिल्पिन ', ' ट्रॅजेडी ', ' शांतिनिकेतन : प्रथमदर्शन ' यांसारख्या कवितांतून एखाद्या नाट्यपूर्ण क्षणावर तोललेली काव्यानुभूती त्यांनी प्रभावीपणे व्यक्त केलेली आहे. ' बिजली 'मधील ' नकळत तुमचे डोळे वळले ' ही कविता म्हणजे एका ढोबळ प्रेमकहाणीचे नाट्यगीत आहे. ' तिच्या ' वयाला जेव्हा सोळा-सतरा वसंत झाले होते, तेव्हाच्या तिच्या यौवनमत्त पदक्षेपात एकदा कवीचे हृदय गवसले. तिच्या संमतीचे आरुण तेजही त्यावर विराजू लागले. नेत्रांची येरझार, निरर्थक संभाषणे, परस्परांची कामे करणे अशा टप्प्यांनी त्यांची प्रेमकहाणी विकसित होत होत एकदा नदीकिनारी अवसेच्या राती दोघांच्या आयुष्यात दिव्य पौर्णिमा झळकून गेली. सगेसोयरे व्यवहाराची रीत सांगू लागले. त्याला कवी भुलला व ' तिला ' मुकला. आता भरल्या संसारी करपलेल्या मनाने कवी रडतो, ' ती ' आपल्या शून्यमहाली हसत असते. हीच नाट्यगीताची मूळ कथा वेगवेगळ्या रूपांत, कधी वेगवेगळे अंश पुनर्रचित करून ' मानसी 'पर्यंत पुनःपुन्हा भेटत राहते. ' फकिराची फिर्याद ', ' फुंकर ', ' कर्णफुले ', ' आशय ', ' क्षणभर या सौधावर ', ' प्रवास ', ' गोष्ट ', ' हीरो ', ' ट्रॅजेडी ', ' सांभाळ ' या नाट्यगीतांत तिचे रुपडे वरवर ओळखू न येण्याइतके बदलते. कधी भूमिकांची आलटापालट होते. प्रेमवंचनेचा मूळ धागा कायम असतो. ' फुंकर 'सारखे नाट्यगीत क्षुब्ध भावसंघर्षाचा अस्फुट आविष्कार घडवते.

" कर्णफुले ही उरली हाती
तीही दुखरी व्याकुळलेली

तळहातांना सांगत बसती
चोरुन गुपिते ऐकियलेली."

अशा भावपूर्ण चेतनोक्तीतून 'कर्णफुले' मध्ये एक उत्कट भावावस्था साकार होते. 'आशय'मध्ये त्याच नाट्याचे प्रतीकात्मक चित्रण समोर येते. 'हीरो'मध्ये सिनेमाची परिभाषा वापरून अतिशय नावीन्यपूर्ण अनोखा ढंग ते धारण करते. 'ट्रॅजेडी'मध्ये त्याच्यातील फक्त दिमाखदार नाट्यक्षण तेवढा फुलविला जातो. 'सांभाळ' मध्ये एका वेगळ्याच कोनातून त्यावर निवेदनाचा झोत टाकला जातो, हे प्रत्येक नाट्य-गीताचे वेगळेपण. त्यामुळे त्याच सनातन नाट्यकथेतील नाट्याला प्रत्येकामध्ये वेगळा गहिरेपणा प्राप्त झालेला आणि याच नाट्यकथेचे अत्यंत विकसित तरीही अत्यंत विस्कळीत, गूढ आणि गहिरे, तरल आणि उत्कट असे रूपदर्शन 'मानसी' या मालिका–कवितेत स्वयंपूर्ण परंतु एककेंद्री अशा छत्तीस काव्याकृतींतून घडताना दिसते. एखाद्या फुलाची एकएक पाकळी नव्या नव्या रंगाचा आणि सुगंधाचा दिमाख उलगडत शेवटी पूर्णविकसित फुलामध्ये परस्परांना खुलविणाऱ्या रंगगंधाच्या नाना-विध छटांचा सुरेख आविष्कार व्हावा, तसे हे रूपदर्शन.

नाट्यगीतांचेच एक वेगळे रूप बापटांच्या 'प्रियंवदा', 'उमा', 'स्वप्न' या संगीतिकांमधून दिसते. तसेच 'एका कुमाराची कहाणी', 'सावंत!', 'सिंदबादची अखेरची सफर' या बापटांचे वेगळे बहिर्मुख व्यक्तिमत्त्व दाखवणाऱ्या किंवा गूढ-गुंजनात्मक नव्या प्रतिमांनी युक्त असलेल्या अशा नाट्यगीतांच्या वेगळेपणाचाही उल्लेख करायला हवा; त्यांचे वैशिष्ट्य ध्यानात घ्यायला हवे.

कवीच्या वैशिष्ट्यांतूनच त्याच्या काव्याच्या मर्यादा रेखल्या जातात. जसजशी कवीची प्रगल्भता वाढत जाते आणि त्याच्या काव्याचा विकास होत जातो, तसतशा या मर्यादांच्या सीमाकृती बदलतात. कधी दूर सरकतात, कधी पुसट होतात, कधी वेगळे लवचिक आकार धारण करतात. काव्याच्या प्रबोधनशक्तीमध्ये आणि संदेश देण्याच्या सामर्थ्यामध्येच काव्याचे सौंदर्य साठवलेले आहे, असे जेव्हा बापटांना प्रामाणिकपणे वाटत होते, तेव्हा त्यांच्या कवितेला चेतक आवाहनाच्या मर्यादा पडलेल्या होत्या. 'बिजली'मधील अनेक कवितांतून याचे प्रत्यंतर येते. महात्मा गांधींचे मंदिर उभारले जाणार या वार्तेने मनात उठलेले विविध विचार-भाव-तरंग 'गांधी मंदिर' या कवितेत उत्कटपणाने व्यक्त करूनही शेवटी—

"इसवि सनाची ही गुंडाळी
संपुन जाइल भविष्यकाळी
कैक पिढ्यांची पाने उलटुन
समाज जाइल पार पालटुन.

गांधीजींच्या उपदेशाची
स्मृती तयाला राहो साची
त्या हृदयाच्या उदारतेचे
अनुकरण तदा होवो साचे.
मानवतेची करण्या पूजा
स्फूर्ती संतत लाभो मनुजा
पोपटपंची
पुराण वाची
अशी तयाची —
स्थिती व्हावया असे नको जर
बांधु नका गांधींचे मंदिर !"

—अशा तऱ्हेचे कवितेचे सार सांगणारे उपदेशाचे ठोस आवाहन केल्याशिवाय कवीला चैन पडत नाही. अशा आवाहनामुळे आधीचे सगळे उत्कट चिंतन बद्द होऊन जाते, हे त्याच्या लक्षात येत नाही. त्यामुळे आवाहन करण्याच्या नादात कविता आवाहकत्व गमावून बसते. राष्ट्रीय स्वरूपाच्या प्रासंगिक भावना व्यक्त करणाऱ्या बापटांच्या बऱ्याच कविता या मर्यादेने बंदिस्त झाल्या. 'बिजली'तल्या मर्यादांचा हा धागा पुढे समरगीतांच्या काहीशा कृत्रिम आणि स्थूल अभिनिवेशाच्या आविष्कारातही कायम राहिलेला दिसून येतोच.

ऐंद्रीय संवेदनांच्या उत्कटतेला महत्त्व देऊन विविध भावानुभवांचा आविष्कार करू लागल्यावर अर्थातच ही मर्यादा पुसट होत गेली. परंतु रचनात्मतेची मर्यादा बराच काळपर्यंत ठळक बनून राहिलेली दिसते. अनुभवाच्या आविष्कारात सहज सेंद्रिय विकास अथवा आशय आणि आविष्कार यांचा श्वासप्राणसंबंध असण्याऐवजी डौलदार, प्रमाणबद्ध, रेखीव आणि म्हणून कृत्रिम रचनाबंधाचा आश्रय बापटांच्या कवितेने बऱ्याच वेळा केला. सफाईदार रेषांची वळणे झिलई देऊन गुळगुळीत करताना अनुभूतीच्या कंगोऱ्यांची धार झिजून बोथट होते, हे लक्षात घेतले गेले नाही. सुंदर शब्दांची आरास, लयबद्ध शब्दांचे नर्तन, प्रतिमांकित शब्दांतून हिंदकळणाऱ्या संवेदना, नव्या शब्दबंधांतून उतटलेल्या भावमुद्रा हे सारे असूनही रचनात्मतेच्या आहारी गेल्यामुळे कित्येक कवितांचे व्यक्तिमत्त्व विभ्रमांतून व्यक्त होण्याऐवजी विभ्रम हेच त्यांचे व्यक्तिमत्त्व बनले. 'मुखवटा'सारख्या कवितेचा आशयाला गुदमरून टाकणारा आविष्कार याची चांगली साक्ष देईल. याचे पर्यवसान बऱ्याच वेळा शब्दांचा विलक्षण सोस निर्माण होण्यात होते. 'धुके', 'सरली झिम्मड' इत्यादी कवितांमध्ये याचे प्रत्यंतर येते.

'अकरावी दिशा' या कवितेत बंधनातीत होणाऱ्या मुक्त संस्कृतिसंवेदनांचा प्रमाथी आविष्कारही काहीसा शब्दवेडा वाटू लागतो. 'कथित समय 'सारख्या कवितेत तर शब्दांच्या नादात आशय हरवूनच जातो. काही संस्कृत सामासिक शब्द, काही लावणीच्या ढंगाचे रंगेल शब्द, काही ऐटबाज उर्दू थाटाचे शब्द वेगवेगळ्या कवितांतून पुनःपुन्हा भेटू लागले की, त्यांतली दाद मागणारी चमत्कृती ओसरू लागते. मोराचा झगमगता पिसारा हे त्याचे ऐश्वर्य असते. पण संपूर्ण पिसाऱ्याचा दिमाख फुलवून मोराला डौलदार नृत्यविन्यास करता आला, तरी जमिनीवरचे पाय उचलून तरलपणे एखादी भरारी तशा अवस्थेत त्याला मारता येत नाही. बापटांच्या कवितेतील शब्दांचे वैभव कधीकधी या प्रकारचे असते. याहीपेक्षा अनुल्लंघ्य ठरलेली मर्यादा म्हणजे बापटांच्या कवितेने बऱ्याच ठिकाणी अनुभवाला मोकळेपणाने उमलू देण्याऐवजी निश्चित आणि ठरीव भूमिका स्वीकारून तो सादर केला. आपल्या अनुभवाचा ठाव घेण्याचा निकराचा प्रयत्न तिने कधी केला नाही. जे गूढ आणि धूसर असेल, त्याचेही सगळे पैलू हाती गवसलेच अशी तिने समजूत करून घेतली आणि समजूत करून दिली.

अर्थात 'बिजली 'पासून 'मानसी 'पर्यंतच्या प्रवासात यांतल्या एकेक मर्यादा ओलांडत आणि पुसून टाकत बापटांच्या कवितेने प्रवास केला आणि 'मानसी 'मध्ये सर्व मर्यादांच्या अतीत झेप घेतली. ('सत्यकथा' जुलै ७८ च्या अंकात विजया राजाध्यक्षांनी 'मानसी 'चे केलेले परीक्षण या संदर्भात उल्लेखनीय आहे.)

गेल्या पंचवीस वर्षांतील वसंत बापटांच्या एकूण कवितेत नव्या क्रांतिकारी विचारांची स्पष्ट जाणीव, आविष्कारातील लयबद्ध गेयता आणि सौंदर्याचा आस्वाद घेण्याची रसिक वृत्ती ही वैशिष्ट्ये क्रमाक्रमाने विकसित होत गेलेली दिसून येतात. कुठल्याही भाववृत्तीशी उत्कटतेने समरस होण्याच्या वृत्तीमुळे बापटांनी सुंदर नाट्य-गीते लिहिली. अर्थपूर्ण सुंदर शब्दांची मोहक रचना त्यांनी सहजतेने आणि सफाईने केली. निसर्गाच्या भाववृत्ती त्यांनी रसिकतेने टिपून घेतल्या आणि स्त्रीसौंदर्याची दिलखुलास अभिलाषा मोकळेपणाने व्यक्त केली. त्यांच्या सामाजिक कवितांतून डोळस निरीक्षण आणि अभिनिवेश यांचा प्रत्यय येतो, तर त्यांच्या प्रेमकवितेत भाव-मुग्ध हळव्या प्रीतीपासून ते देहमीलनाच्या उन्मादापर्यंत विविध छटा दिसून येतात. अर्थपूर्ण नव्या प्रतीकांच्या आणि प्रभावी प्रतिमांच्या विविध रचनाकृती त्यांची कविता सादर करते. प्रेमलुब्ध मनाचे चित्रण असो, की आत्मरत अनुभूतीचा आविष्कार असो, बापटांची कविता त्याला चित्रमय बनवून शब्दांकित करते. लावणीचा अस्सल शाहिरी छंद तिने जोपासला, तसाच पुराणबंधांचा प्रतिमांसाठी नवेपणाने वापरही केला. कडवा उपरोध आणि हळवा आविष्कार या परस्परविरुद्ध रूपांत ती सारख्याच सहजपणाने आणि स्वाभाविकतेने प्रगट झाली. लय, नाद

आणि भावार्तता यांचा सुमेळ साधण्याचा तिने अनेकदा प्रयत्न केला. आदर्शांची ओढ नि दिव्यतेचा ध्यास, महान व्यक्तींची श्रद्धापूजा, संस्कृतीचा अभिमान यांचे वेड तिने जसे बाळगले, तशीच उन्मुक्ततेची ओढ, प्रत्यक्षानुभूतीतून आरपार जाऊन सौंदर्याचा वेध घेण्याची उत्सुकता, अंतर्मनाची वेदना यांतही ती अगदी मनापासून रमली. एकूण विविधतापूर्ण कलानुभव बापटांच्या कवितेने गेल्या पंचवीस वर्षांत विविधतापूर्ण विभ्रमांनी आविष्कृत केले.

लोकप्रियतेच्या प्रकाशात सातत्याने राहिलेल्या एका समर्थ शब्दप्रभूची ही रौप्य-महोत्सवी अक्षरयात्रा वैभवाने नटलेली आहे !

## साभार स्वीकार

धारिया मोहन : सफर : विश्वकर्मा प्रकाशन, पुणे ३०; रु. ४०.
ठोंबरे उमाकांत (अनु.) : आणखी एक द्रोणाचार्य; अभिनव प्रकाशन, मुंबई १४; रु. ७.
नातू म. गं. : वेदनेचा वेध; अभिनव प्रकाशन, मुंबई १४; रु. १५.
भट गो. के. : वागीश्वरी; प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई; रु. १०
गाडगीळ काकासाहेब : सभाशास्त्र : प्रेस्टीज प्रकाशन, टिळक रोड, पुणे ३० रु. २५.
चव्हाण यशवंतराव : ऋणानुबंध; प्रेस्टीज प्रकाशन, टिळक रोड, पुणे ३० रु. ३०.
मंगळवेढेकर राजा (संपा.) : जन्मदा; खंड ३, सौ. कमलाबाई पारखे, पुणे ५; रु. २५.
देशपांडे वि. भा. : नाटककार खानोलकर; नूतन प्रकाशन, पुणे ३०, रु. ८
जाधव सुदाम : संवाद; सौ. सुशीला जाधव, सुलभा प्रकाशन, 'भिल पल्टन' कन्नड; रु. ६
जोशी स. कृ. : जय जय रघुवीर समर्थ; अ. ल. गाडगीळ, पुणे ३०; रु; ६.
स्वामी माधवनाथ : दासबोधातून ज्ञानेश्वरीकडे; अ. ल. गाडगीळ, पुणे ३०, रु. २·५०.
महाजन न. प. : श्रीरामदास-समर्थ संत, वोरा अँड कं. मुंबई;
श्रीधरपदांकित (संकलक) : दैनिक दासबोध चिंतन; अ. ल. गाडगीळ, पुणे ३

## २

# ना. सं. इनामदार यांची ऐतिहासिक कादंबरी

**विश्वास जहागिरदार**

---

'झेप' ही समर्थ कादंबरी लिहून ना. सं. इनामदार यांनी मराठी ऐतिहासिक कादंबरीच्या क्षेत्रातील पहिलेच पाऊल अतिशय दमदारपणे टाकले. या लेखकाचे उत्तर पेशवाईतल्या मराठी राजकारणाचे आकलन अतिशय सूक्ष्म असल्याने इतर कुणाही लेखकापेक्षा या कालखंडातील व्यक्तिमत्त्वांचा वेध घेणे त्याला अधिक साधणे शक्य होते. आपण या निमित्ताने इतिहासशुद्धीचे कार्यही करून टाकले असा ना. सं. इनामदारांना अभिमान आहे. आपल्या या भूमिकेच्या प्रतिपादनासाठी त्यांनी तेवढ्याच विस्तृत प्रस्तावना लिहून आपली मते अभिनिवेशाने मांडली आहेत. त्या प्रतिपादनाच्या प्रामाण्याची चिकित्सा इथे अप्रस्तुत ठरेल. पण याही कारणाने त्यांच्या कादंबऱ्या खूप गाजल्या, याची नोंद घेणे आवश्यक आहे. 'स्वामी' आणि 'श्रीमान योगी' यांच्या तुलनेने हे परिश्रम अर्थपूर्ण आहेत.

पडत्या काळातील पेशवाईला सावरून धरण्याचा प्रयत्न करू पाहणाऱ्या व त्यासाठी आपले संपूर्ण आयुष्य वेचणाऱ्या त्रिंबकजी डेंगळे याच्याकडे इनामदार एका कलावंताच्या भूमिकेतून आकृष्ट झालेले आहेत आणि त्यातून घडलेल्या त्रिंबकजीचे चित्रण विभूतिपूजेतून केले जात नाही, तर जीवनाचे एक वेगळे आव्हान स्वीकारणारा माणूस म्हणून होते. त्रिंबकजी हा इतिहासात चांगल्या अर्थाने जनमानसात आदराचे स्थान मिळवलेला माणूस नाही. शिवाय तो पेशव्यांचा एक नोकर असल्याने एखाद्या व्यक्तीबद्दलच्या आदराचे जनमानसातील गंड सुखावणे हे इनामदारांचे कार्य राहत नाही. इथे लेखकाने एक धगधगत्या जीवनाची प्रत्ययाला आलेली धग जिवंत करण्याचे आव्हान स्वीकारले आहे.

उत्तर पेशवाईच्या काळातील पेशवे-गायकवाड व इंग्रज यांचे अत्यंत सूक्ष्म आकलन इनामदार मांडू पाहतात. इंग्रज सगळीकडून कच्चे बुरूज हेरीत असताना, इकडच्या बाजूने त्रिंबकजी, पेशव्यांच्यापासून दुरावलेल्या गायकवाडांना जवळ करण्याच्या अत्यंत महत्त्वाकांक्षी हालचाली करतो. या दृष्टीने गंगाधरशास्त्र्यांसारख्या

अत्यंत बुद्धिमान व धोरणी माणसात थक्क करणारे परिवर्तन आपल्या मुत्सद्देगिरीच्या व पेशवाईवरील प्रेमाच्या बळावर तो घडवितो. या त्रिंबकजींना इंग्रज अधिकारी अतिशय ओळखून होते. गंगाधरशास्त्र्यांचा खून आपण करून, हा खून त्रिंबकजीनेच केला असा भास निर्माण व्हावा अशी कारवाई इंग्रज अधिकारी करतात. असे एकूण चित्र दिसते की, गंगाधरशास्त्र्यांचा जर खून झाला नसता, तर त्रिंबकजीच्या मुत्सद्देगिरीने कदाचित इतिहास बदलता.

गंगाधरशास्त्र्यांबरोबरच्या ह्या वाटाघाटी इतक्या नाजूक परिस्थितीत करावयाच्या असतात की, आपले ईप्सित साध्य होईपर्यंत याचा बभ्रा झाला तर खुद्द गायकवाडच बिथरायचे. पण इंग्रजही शक्यतांच्या बाबतीत तेवढेच जागरूक. मराठी सत्ता जवळजवळ त्यांच्या घशात गेल्यातच जमा होती. अशा परिस्थितीत एका उदात्त तत्त्वाने प्रेरित होऊन त्रिंबकजीने दिलेली ही लढाई होती. ज्यांच्या पायावर भक्ती ठेवून तो हे करत होता ते पेशवेदेखील त्याच्यासाठी काहीही करायला असहाय होते. त्रिंबकजीचे आयुष्य ही एक दुर्दैवी शोकांतिका आहे.

त्रिंबकजी इतिहासाप्रमाणे जीवनाचेही एक आव्हान आहे. पेशव्यांच्याशिवाय त्याला दैवत नाही. पेशव्यांच्या वरची त्याची निस्सीम निष्ठा परमार्थाने मराठी दौलतीवरची आहे. म्हणूनच तिला गिळंकृत करू पाहणाऱ्या इंग्रजांबद्दल त्याच्या रोमरोमांत त्वेष भरलेला आहे. त्रिंबकजीबद्दल विचार करताना रामावर अपार प्रेम असलेल्या आणि रामाशिवाय इतर कुठलेच प्रेम नसणाऱ्या लक्ष्मणाची सहजच आठवण होते. एका 'वनवासा'त पेशव्यांची सर्वतोपरी काळजी तो घेतो आहे. म्हणूनच त्याला स्वतःचा संसार असला तरी त्याकडे लक्ष द्यायला वेळ नाही.

'झेप'मध्ये कुठल्याही पूर्वसूरींपेक्षा ऐतिहासिक वातावरण जिवंतपणे साकार झाले आहे. या अंगाने विचार करता 'झेप' ही या प्रकारची पहिलीच कादंबरी आहे असे म्हणणे धाष्टर्याचे ठरू नये. हे ऐतिहासिक वातावरण जिवंत झाल्याखेरीज त्रिंबकजी डेंगळा जिवंत होऊ शकतच नव्हता हेही लक्षात घेतले पाहिजे. हे ऐतिहासिक वातावरण, दरबाराचे तपशीलवार वर्णन, पोशाखाचे वर्णन यांसारखे तपशिलात्मक नसते, तर या काळातील सबंध राजकीय ताण इथे चित्रित होत आहेत. हे संपूर्ण राजकारणच आपल्या डोळ्यांदेखत घडते असा प्रत्यय ही कादंबरी देते. मराठ्यांच्या राजकारणाचा सबंध भार शिरावर घेणारा त्रिंबकजीही हे ऐतिहासिक वास्तव जिवंत होत असताना तेजाने तळपत जातो.

'झेप' लिहिणाऱ्या ना. सं. इनामदारांची प्रकृती रणजित देसायांच्या तुलनेने अधिक गंभीर आहे. अनावश्यक अशा कल्पिताचा मुक्त वापर करून कादंबरी रंजक करण्याचा ते कुठेही प्रयत्न करीत नाहीत. 'स्वामी' नंतर मराठी ऐतिहासिक कादंबरी 'झेप'च्या रूपाने जीवनदर्शनाकडे, तिच्या अस्सल प्रयोजनाकडे वळली. त्रिंबकजी हे

अनुक्रमणिका

एक अस्सल आणि असाधारण जीवन आहे. त्रिंबकजीचा काळ हा पेशवाईतील अतिशय आणीबाणीचा काळ होता. दौलतीचे वैभव पार लयाला गेलेले होते. ज्या काळात राजाच्या विश्वासावर प्रजा सुरक्षित असे, तो पानिपतपूर्वकाळ गेलेला होता. अशा परिस्थितीत राजाशी निष्ठा राखणे हे पोटाच्या-सुखाच्या दृष्टीने अशक्य झाले होते. हेरगिरीच्या सुळसुळाटातही जपल्या जाणाऱ्या, जोपासल्या जाणाऱ्या निष्ठा नव्हत्या असे नाही.

१

या कादंबरीत गणपतराव पानश्यांचे जे चित्रण येते ते मोठे मर्मस्पर्शी आहे. पानश्यांसारखी माणसे स्वतःचा संसार उद्ध्वस्त करून घेऊनही आपल्यावर अन्याय करणाऱ्या त्रिंबकजीवर चिडत नव्हती. पण ही उदाहरणे होती तरी किती? भोवऱ्याच्या जवळ आलेल्या नावेला सावरण्यासाठी धडपडणाऱ्या नाविकासारख्या या हालचाली आहेत. पण यातून जो अनुभव व्यक्त होतो त्यातून मात्र जीवनाचे एक चिरंतन सत्य प्रत्ययाला आल्याखेरीज राहत नाही. कल्पिताचा अ-कलात्म कारणासाठी वटवटीत-पणे वापर करण्याच्या प्रवृत्तीतून काही अंशाने का होईना, सुटू न शकलेल्या मराठी ऐतिहासिक कादंबरीच्या परंपरेत 'झेप' हा अतिशय अनोखा प्रयोग आहे. 'झेप' हे निरोगी आणि स्वच्छ लेखनशिल्प आहे हे अक्षरशः खरे आहे.

२

झुंज (१९६६) ही इनामदारांची दुसरी कादंबरी उत्तर पेशवाईतच लढणाऱ्या एका दुर्दम्य जीवनाची गाथा आहे. 'गाथा' हा शब्द इथे सप्रयोजन वापरला आहे. इनामदारांच्या नेहमीच्या पद्धतीनेच ही कादंबरी रूप घेते. इतिहासाने झाकळून टाकलेले तेच कुतूहलजनक जीवन, त्याच्या सभोवतालची विशिष्ट पद्धतीने त्याचे हे आयुष्य शोकात्म करणारी परिस्थिती आणि याच विशिष्ट पद्धतीने ठसा उमटवणारे ऐतिहासिक वातावरण! जणू एकाच कीर्तनकाराने त्याच्या नेहमीच्या शैलीत वेग-वेगळी आख्याने लावावीत अशीच हीसुद्धा एक कादंबरी.

यशवंतराव होळकर हा या कादंबरीचा नायक ज्या वातावरणात उभा आहे ते 'झेप'च्या मानाने अधिक गुंतागुंतीचे आहे. खुद्द स्वतःच्या कुटुंबापासूनच त्याच्या आयुष्यात 'झुंज' घेणे सुरू झाले आहे. 'लेकावळा' म्हणून घरातील बंधूकडून त्याची उपेक्षा होत असते. वडिलांच्या मृत्यूनंतर त्याचा 'वनवास' सुरू होतो. तो आयुष्यभर संपत नाही.

यशवंतरावला सोबत करणारी अनेक माणसे या कादंबरीत आहेत. धर्मा, गोपाळ-भट, धारचे महाराज, तुळसा, महाडिक, नबाब यांच्यासारखी. परंतु या सर्वांची मदत ज्या ध्येयासाठी घ्यायची तो देवच कायमचा दुरावलेला. या कादंबरीत प्रत्यक्ष भेटीचा प्रसंग न दाखवताही चित्रित केलेले, तरीही, सर्वांत महत्त्वाचे संबंध पेशवे-

अनुक्रमणिका

यशवंतराव संबंध आहेत. संपूर्ण कादंबरीइतके हे संबंधही गुंतागुंतीचे आहेत. पेशवे प्रारंभी यशवंतरावबरोबर वागण्यात चुकतात. यशवंतरावची ही बाजू इनामदारांनी फारच अर्थपूर्ण बनवली आहे.

ज्या पेशव्यांनी यशवंतरावच्या वडील भावाला—विठोजीला-पकडून मैदानात हत्तीच्या पायाला बांधून फरफटत ठार मारले, तेच पेशवे यशवंतरावाला भिऊन पळून जातात. हे तेच पेशवे आहेत. ते आपल्या पराक्रमाचे कौतुक करतील व आपल्या चाकरीचा स्वीकार करतील, या स्वप्नावर यशवंतराव जगतो आहे. यशवंतरावच्या जीवनाची खरी शोकांतिका हीच आहे की, त्याच्या गळयात विजयश्रीने माळ घालूनही पेशव्यांच्या कौतुकापासून तो वंचितच राहिला. काटयाच्या कुरुपासारखे हे दुःख त्याच्या वाटचालीत सोबत आहे. हे दुःख कधी संपलेच नाही. उलट प्रत्येक विजयाला विफल करीत गेले—

"फार उमेद बाळगून होतो आम्ही. अश्वमेध यज्ञ करायचा होता. श्रीमंतांसाठी घोडा सोडायचा होता. त्या घोड्याच्यामागून होळकरांचा तोफखाना जाणार होता. पण काहीच जमलं नाही." ( पृ. ६०, आवृत्ती तिसरी )

"बंडवाला होळकर ! वेडा होळकर ! कोण वेडं नव्हतं ? श्रीमंत, का हिणवता आम्हांला ? आम्हांला वेड तुमचं, दौलतीचं, झुंजण्याचं." ( उ. नि. पृ. ६०९ )

हे वेड, त्यातून दिलेली झुंज व पेशव्यांकडून तिची झालेली उपेक्षा हा यशवंतरावच्या जीवनाचा गाभा आहे. म्हणूनच या कादंबरीची ती आकृती असायला हवी. परंतु इनामदारांनी स्वतःच्या नव्या संशोधनाने हाती आलेल्या तुळशीच्या कथानकाने या आकृतीला शेवटी 'उपसंहारा'त तडा दिला आहे. म्हणून 'झेप' इतका एकजिनसी व प्रत्ययकारी आविष्कार 'झुंज'मध्ये होत नाही.

कादंबरीकार म्हणून इनामदारांत 'झुंज' च्या रूपाने आणखी एक घटक आला. तो म्हणजे सुटया सुटया प्रेमप्रकरणांचे अंतःप्रवाह. 'झुंज' मधील 'तुळसा' व 'केशर' यांचे प्रेम कादंबरीशी विपरीत वाटते. 'झुंज' मध्ये केशरसाठी झुरणारा यशवंतराव शेवटी नाचगाणाऱ्यांच्या अतिरिक्त आहारी गेलेला आहे. या चित्रणामुळे या कादंबरीची आकृतीच बिघडते; व कादंबरीच्या गाभ्याशी असलेले नाटय कमजोर होते.

३

'झेप' आणि 'झुंज' या कादंबऱ्या मराठीतील चांगल्या दर्जाच्या ऐतिहासिक कादंबऱ्या आहेत. जीवनाकडे जाण्याची इनामदारांची भूमिका इथपर्यंत तरी कलावंताची होती. उत्तर पेशवाईतील या महत्त्वाच्या व्यक्ती असल्या तरी पेशवाईच्या अस्ताची संपूर्ण जबाबदारी त्यांच्यावर येणे कुठल्याही अन्वयाने शक्य नाही. कोसळणाऱ्या छताला सावरू पाहणाऱ्या अनेक हातांपैकी हे हात. त्यांच्या या निष्ठेत जीवनाचे

अनुक्रमणिका

एक अर्थपूर्ण दर्शन घडते. म्हणूनच ऐतिहासिक उत्तरदायित्वापेक्षा एक जीवनसत्य म्हणून त्यांच्यावर टाकलेला प्रकाश वाङ्मयदृष्ट्या मोलाचा आहे.

परंतु 'झेप' आणि 'झुंज' यांच्यामध्ये प्रत्यक्ष न प्रकट झालेली इनामदारांची मनोवृत्ती 'मंत्रावेगळा' मध्ये चक्क उघडी पडली आहे. 'झेप' आणि 'झुंज' यांतील कथानक मराठीच्या अस्ताला संपत नाही. थोडे अंतर ठेवून ते अलीकडेच थांबते. परंतु 'मंत्रावेगळा'चा नायक (दुसरा बाजीराव) पर्यायाने सर्व राजकारणाची पदसिद्ध जबाबदारी असलेला नायक आहे. त्यामुळे नायक म्हणून त्याचा स्वीकार करताक्षणी त्याच्या समर्थनाची एक जबाबदारी इनामदार घेतात. ऐतिहासिक वास्तवाकडे पाहणारी ही दृष्टी रोमँटिक असल्याने तिच्या परीने तिला दिसलेला (किंवा तिने दाखविलेला) हा नायक 'मंत्रावेगळा' सिद्ध करण्याखेरीज तिला गत्यंतर नव्हते.

प्रश्न असा निर्माण करता येतो की, 'राजा कालस्य कारणम्' हे सूत्र जर बाजीरावाचा पाठपुरावा करण्यासाठी समर्थ असेल, तर काळाच्या या नियतीतील बाजीरावाच्या तोकड्या हालचाली दाखवून काय निष्पन्न होणार आहे? त्यातून ऐतिहासिक पुरावे नाकारता येत नसल्याने बाजीरावांचे सर्व छंद-फंद इनामदार झाकू शकत नाहीत. यालाही ते जेव्हा वेगळेच—रसिकतेचे स्वरूप देतात, तेव्हा तर या धडपडीची कीव यायला लागते. बाजीरावाच्या अपयशाचे श्रेय नियतीला दिल्याने त्यामागे उभे असलेले जीवनाचे विदारक, असहाय रूप चित्रित करण्यासाठी हवी असलेली प्रतिभेची कुवत इथे कमी पडते. नियतीच्या तडाख्यांनी माणसे किती वेळूटपणे उघडी पडतात हे चित्रित करणारी मनोवृत्ती जर रोमँटिक असेल, तर ती त्या उघडे पडण्यावरही पांघरूणे घालीत राहते असे दिसते. या प्रयत्नात साध्य काहीच होत नाही. नायकही झाकला जात नाही आणि जीवनाचे वास्तवही प्रत्ययाला येत नाही.

प्रदीर्घ प्रस्तावना, 'मंत्रावेगळा' हे शीर्षक व संपूर्ण कलाकृती यांमधून इनामदारांना इतिहासाने निर्मिलेली दुसऱ्या बाजीरावाची प्रतिमा आग्रहाने उजळायची आहे. सबंध कादंबरीला समर्थनाचा आकार येत गेला आहे, तो यामुळे. इतिहासाने या कादंबरीतील नव्या बाजूमुळे स्वतःमध्ये काय दुरुस्ती करून घेतली हे कळायला मार्ग नाही. पण या कारणाने कादंबरीचे रूप बिघडले आहे एवढे मात्र खरे. मंत्रावेगळा' ही कादंबरी नाही, चरित्र नाही आणि इतिहासही नाही. कादंबरी म्हणून इथे जीवनदर्शनाची बाजू लंगडी आहे. चरित्राला तर्कप्रामाण्य लागते, तर इथे भोंगळ समर्थन आहे आणि इतिहासाचे लेखन या स्वरूपात असत नाही.

'राऊ' (१९७२) या इनामदारांच्या कादंबरीने इतिहासाचा थोडा मागचा कालखंड निवडला आहे. पहिला बाजीराव आणि मस्तानी यांची प्रेमकथा हा लेखकाच्या कुतूहलाचा विषय आहे. पेशवाईच्या सुरुवातीच्या वैभवाची व दिग्विजयी

कालखंडाची पार्श्वभूमी या प्रेमकथेला आहे. इतिहास आणि प्रेमकथा यांचे संबंध हिंदीतल्या 'मोगले आझम' या चित्रपटासारखे आहेत.

ऐतिहासिक कादंबरी म्हणून जर राऊला एका ललित कलाकृतीचे रूप प्राप्त करून द्यायचे असेल, तर ऐतिहासिक वास्तव आणि बाजीराव मस्तानी यांचे प्रेम यांचे अपरिहार्य नाते समर्थपणे अखेरपर्यंत टिकवता आले पाहिजे. इथे इनामदार स्वतःसाठी जमेची बाजू करून घेतात, ती अशी : "अनेक अंगवस्त्रं ठेवण्यात भूषण मानण्याच्या ह्या काळातही बाजीरावानं मस्तानीवर उत्कट प्रेम करावं, ब्राम्हणी आणि यवनी संस्काराची देवाणघेवाण करावी हे समाजाला मंजूर नव्हतं. त्या वणव्यानं बाजीराव-मस्तानी या युगुलाला घेरलं आणि पाहता पाहता त्यांचा बळी घेतला." (प्रस्तावना)

'राऊ' या कादंबरीत या बाजूनेच सर्व कच्चे दुवे एकत्र झाले आहेत. एका यवनीच्या नादाने बाजीरावाचे ब्राम्हणत्व बिघडते, बाटते आहे. यामुळे बाजीरावाचे कुटुंबीय अस्वस्थ होतात. हे चित्रण भडक करताना बाजीरावाला मद्य-मांसाची सवयही इनामदार लावतात; आणि इतिहास, प्रेमकथा व कादंबरी या तिन्ही बुरुजांवरून त्याला ढकलून देतात.

वस्तुतः एका लघुकथेतही आटोपता येणाऱ्या 'राऊ' ह्या जीवनाच्या आशयाला साडेचारशे पृष्ठांचा आकार देण्याचे काही कारण नव्हते. पण पेशवाईच्या वैभवाच्या वातावरणात कादंबरीकार म्हणून श्वास घेताना इनामदारही धुंद झाले आणि रंजक करण्याच्या इराद्याने कादंबरीला खालच्या पातळीवर आणले गेले.

ना. सं. इनामदार या कादंबरीकाराची वाङ्मयीन वाटचाल लक्षात घेता 'झेप' ते 'राऊ' ही उतरती भांजणी आहे, असे म्हणावेसे वाटते. या समर्थ आणि रससिद्ध लेखकाने पुन्हा एकदा 'झेप' घ्यायलाच हवी!

## साभार स्वीकार

काळे. दि. वि. : समर्थ वाङ्मयाचा प्रसार आणि प्रचार : अ. ल. गाडगीळ, पुणे ३०.

श्रीसमर्थ रामदास, आत्माराम, मनोबोध — अ. ल. गाडगीळ, पुणे ३०.

देशमुख अमृत : तराणा; व्ही. आर. भुसारी, नांदेड; रु. ५.

वाघमारे योगिराज : उद्रेक; अभिनव प्रकाशन, मुंबई १४; रु. १५.

अनुक्रमणिका

# ३

# सूचींची सूची : शोध आणि बोध

**कृ. शं. हिंगवे**

अभ्यासकांना उपयोगी पडेल या हेतूने प्रेरित होऊन डॉ. सु. रा. चुनेकरांनी 'सूचींच्या सूची'चा तिसरा हप्ता तयार केला व महाराष्ट्र-साहित्य-पत्रिकेच्या जुलै-डिसें. १९७८ (जोड अंकात) सादर केला. चुनेकरांनी हाती घेतलेल्या उपक्रमांची उपयुक्तता अधिक वाढीस लागावी या हेतूनेच प्रस्तुत लेखात सूचींच्या सूचीचा शोध घेण्याचा प्रयत्न केला आहे. लेखक-सूची (Author Bibliography), विषय-सूची (Subject Bibliography), राष्ट्रीय अथवा प्रादेशिक सूची (National or Regional Bibliography), भाषानिहाय सूची (Language Bibliography), बृहत्-सूची (Universal Bibliography) आणि सूचींची सूची (Bibliography of Bibliographies) हे सूचींचे रूढ प्रकार आहेत. मराठी संदर्भ-साहित्य समृद्ध होत असतानाच त्याची गुणवत्ताही कशी जोपासली जाईल, याकडे लक्ष देणे आवश्यक वाटू लागले आहे. संदर्भग्रंथ तयार करण्याचे तंत्र आता पूर्णावस्थेस पोहोचले असून आधारभूत तत्त्वांच्या आधारे शेकडो अचूक संदर्भग्रंथ आज पाश्चात्त्य देशांत प्रतिवर्षी प्रसिद्ध होत आहेत. अभ्यासकांचा, संशोधकांचा बहुमोल वेळ वाचवून त्याला हवी असलेली माहिती तात्काळ व अचूकपणे उपलब्ध करून देणे हे संदर्भग्रंथाचे प्रमुख कार्य असते. हा हेतू साध्य करण्यासाठी संदर्भग्रंथात दिलेल्या नोंदींमध्ये (माहितीमध्ये) (१) सर्व नोंदींत एकसूत्रता व सुसंगती राखणे व (२) चुकीची माहिती येणार नाही याची दक्षता घेणे, या दोन महत्त्वाच्या सूत्रांचा उल्लेख प्रा. म. वा. धोंड यांनी आपल्या 'प्राचीन मराठीचा पहिला वाङ्मय-कोश'[१] या लेखात केला आहे. सूची-संकलनाबाबत वरील दोन तत्त्वे किती प्रमाणभूत ठरतात, याची कल्पना पुढील संदर्भावरून येईल. "The best bibliographies are notable for their consistency of purpose and treatment The details are given in the same order and form throughout"[२] सूची-संकलनासंबंधी युनोतर्फे जी मार्गदर्शक तत्त्वे स्वीकृत करण्यात आली आहेत

त्यांमध्ये असे म्हटले आहे की, " As with any state of standards, adherence to them will ensure, if nothing more, a degree of uniformity both within a bibliography and between various bibliographies."[३] सूचीचे संकलन कसे केले जावे यासंबंधी ख्यातनाम सूचिकार कै. शंकर गणेश दाते लिहितात, " प्रत्यक्ष ग्रंथाचे वर्णन लिहून काढणे व अभ्यासकांना उपयुक्त होईल अशा पद्धतीने मांडणी करणे, "[४] या दोन गोष्टींकडे सूचीकाराने लक्ष दिले पाहिजे.

सूचींची सूची ज्यांनी सादर केली आहे, त्यांनी ज्या सूचींच्या नोंदी केल्या आहेत त्या पूर्ण आहेत असे नाही. " अभ्यासकांनी सावधतेनेच त्यांचा उपयोग करावा " असे विधान करून चालणार नाही. त्यामुळे संकलनकार आपली जबाबदारी टाळू शकत नाही. आपण ज्या नोंदींचा उल्लेख आपल्या सूचीत करणार आहोत त्या निर्दोष आहेत याबद्दल खात्री पटवून घेण्याची जबाबदारी कोणी पत्करावयाची ?

डॉ. चुनेकरांनी आपल्या सूचींच्या सूचीमध्ये ' व्यक्ति-सूची ', ' विषय-सूची ' व ' संकीर्ण सूची ' या तीन विभागांत एकूण एकशे चाळीस सूचींच्या नोंदी दिल्या आहेत. या सर्व सूचींची नावे संकलनकारांनी प्रत्यक्ष पुस्तके पाहून नोंदविली आहेत की नाही, हे समजण्यास मार्ग नाही. नोंदींवरून सहज नजर फिरवत असताना कुठे-तरी खटकल्यासारखे वाटते.

क्र. १३३ या नोंदीत ' A Bibliography of Ramayana ' या पुस्तकासंबंधी जो तपशील दिला आहे तो संपूर्ण चुकीचा आहे, हे पुढील विवेचनावरून लक्षात येईल. नोंदीत प्रकाशनस्थल ' Pune ' दिले आहे. प्रत्यक्षात आहे ' Poona '. नोंदीत प्रकाशनकाल दिला नाही. आहे 1943. नोंदीत पुस्तकाची किंमत आहे : Rs. 9–50. प्रत्यक्षात आहे : Rs. 1–8. नोंदीत पृष्ठे दिली नाहीत. प्रत्यक्षात आहेत : V+3+99. नोंदीतील तपशिलावरून ' Sir Parshurambhau College ' हे प्रकाशक वाटतात. प्रकाशक आहेत ' N. A. Gore. ' पुस्तकाच्या मुखपृष्ठावर ' Prof. N. A. Gore ' असे म्हटले नाही. नोंदीत मात्र तसा उल्लेख आहे. क्र. १४० या नोंदीत ' A World Bibliography of Bibliographies ' या पुस्तकाच्या तेवीस वर्षांपूर्वी प्रसिद्ध झालेल्या तिसऱ्या आवृत्तीचा उल्लेख आहे. लेखकाचे नाव अशा पद्धतीने दिले आहे की, Besterman' च्या ऐवजी 'Theodore' हाच लेखक वाटावा. क्र. १४० खाली नोंदविलेल्या नोंदीत प्रकाशकाचे नाव दिले नाही; आणि लेखक आणि प्रकाशनकाल यासंबंधीचा तपशील क्र. १३५ खाली दिलेल्या तपशिलाशी विसंगत आहे. Theodore Besterman यांची ' A World Bibliography of Bibliographies ' हा सूचिग्रंथ पाच खंडांमध्ये १९६६ मध्ये प्रसिद्ध झाला असून त्याचे प्रकाशक आहेत Societas Bibliographica आणि त्याचे प्रकाशनस्थल आहे Lausanne. सूचींच्या सूचीचे संकलनकार म्हणतात, " मुख्यतः स्फुट,

नियतकालिकादिकांत इतस्ततः विखुरलेल्या सूचींचे हे संकलन आहे. पण संकीर्ण विभागात अशा अनेक नोंदी आहेत की, ज्या वरील विधानाचा फोलपणा व्यक्त करतात. क्र. १३८ या नोंदीत 'Aspects of Indian Culture : Select Bibliography on History and Culture' या सूचीचा उल्लेख आहे. ती कधी प्रसिद्ध झाली, तिची किंमत काय, पृष्ठे किती, याचा नोंदीत उल्लेख नाही. 'Aspects of Indian Culture' या सूचीला 'सूचींच्या सूची'मध्ये स्थान दिले जाते, तर १९७७ मध्ये 'गोखले इन्स्टिटयूट ऑफ पॉलिटिक्स ॲण्ड एकॉनॉमिक्स' आणि 'इंडिअन कौन्सिल ऑफ सोशल रिसर्च' यांनी तयार केलेल्या 'Annotated Bibliography on the Economic History of India (1500 A. D. to 1947 A. D.) Vols. 1–3' या सूचीचा उल्लेख का नसावा? त्यामागचे धोरण कोणते? कोणतीही सूची तयार करताना काही संदर्भांची नोंद करणे राहून जाते; आणि ते क्षम्यही आहे. तथापि एकाच नियतकालिकामधील, एकाच पुस्तकातील, एकाच ग्रंथालयातील काही सूचींचा उल्लेख करावयाचा, तर काहींचा करावयाचा नाही हे मात्र क्षम्य नाही. नजरचुकीमुळे सूचींच्या सूचीमध्ये तसे घडले आहे. 'Journal of the University of Poona : Humanities Section : No. 35' यात प्रसिद्ध झालेल्या 'Bibliography of Political Thought and Institutions in Ancient and Medieval India' या सूचीचा क्र. १३७ नोंदीखाली उल्लेख आहे. मग त्याच नियतकालिकाच्या त्याच विभागात No. 33 मध्ये पृष्ठे ७९ ते ९३ वर प्रसिद्ध झालेल्या 'Higher Education in India : a select bibliography: 1947–1969' या सूचीचा उल्लेख का नाही? 'महाराष्ट्र-जीवन : परंपरा, प्रगती आणि समस्या, खं. २' यामध्ये पृ. ५६३–५७२ वर प्रसिद्ध झालेल्या 'आधुनिक महाराष्ट्राचे शंभर शिल्पकार' हा उल्लेख नोंद क्र. ११४ मध्ये सूचींच्या सूचीत आहे. त्याच ग्रंथात, त्याच खंडात पृष्ठे १३०–१३४ वर दिलेली मानववंशशास्त्र व समाजशास्त्र यांची सूची संकलनकारांच्या नजरेतून कशी सुटली? जयकर ग्रंथालयाने चक्रमुद्रित केलेल्या सूचीचा उल्लेख नोंद क्र. ३१ वर केला आहे. मग त्याच ग्रंथालयातर्फे चक्रमुद्रित केलेल्या 'मराठी दोलामुद्रितांची तालिका, १९६४' व 'Bibliography of Indian culture, Art' यांचा उल्लेख सूचींच्या सूचीमध्ये करायचा कसा राहिला? नोंदविलेल्या काही नोंदी अभ्यासकांना, संशोधकांना मार्गदर्शक ठरतीलच असे वाटत नाही. परंतु दि. ९–११–१९७८ च्या दै. 'सकाळ'मध्ये प्रसिद्ध झालेली 'शंभर ग्रंथांचा शोध' (महाराष्ट्र-जीवन, परंपरा यांविषयी माहिती देणाऱ्या पुस्तकांची यादी) ही सूची संशोधकांना निश्चितपणे उपयोगी ठरणार आहे. तिचा उल्लेख सूचींच्या सूचीत का नसावा हे समजू शकत नाही.

संकीर्ण विभागात क्र. १२७ 'A Select Bibliography of Arabindo's

Works, क्र. १२९ Books and Articles by Dr. D. D. Kosambi, क्र. १३० 'Bibliograply of Books and other contributions of Dr. V. Raghavan' या नोंदी व्यक्ति-सूचीखाली नोंदविणे आवश्यक होते. क्र. १३१ व क्र. १३२ यांमध्ये केलेल्या नोंदींच्या आधारे आवश्यक तो संदर्भ मिळविण्यात दोन-अडीच तास ग्रंथालयात घालविले. 'प्रवासी' व 'मॉडर्न रिव्ह्यू' यांच्या कोणत्या अंकात सूची प्रसिद्ध झाली आहे या माहितीच्या अभावी दोन ग्रंथालयांमधून निराश होऊन मी बाहेर पडलो. व्यक्ति-सूचीतील क्रमरचना क्लिष्ट वाटते. 'कै. म. म. पां. वा.' ही अक्षरे ओलांडल्यानंतर 'काणे' यांच्या मराठी ग्रंथांची व लेखांची सूची सापडते. 'डॉ.' 'प्रा.' इ. संक्षेपात्मक शब्द वर्णानुक्रम जुळविताना सामान्यतः गाळतात, याची सूचिकारांना कल्पना नसावी.

इतरही अनेक गोष्टी आहेत. जागेच्या अभावी त्यांचा उल्लेख करता येत नाही. तथापि "निश्चित धोरणानुसार शोध न घेता मला जेवढे गवसले ते मी कसेतरी मांडले. तुम्ही मात्र त्याचा सावधतेने उपयोग करा." ही भूमिका सूचिशास्त्राच्या सिद्धान्ताशी विसंगत वाटते. त्यात परिवर्तन होणे अत्यावश्यक वाटते. नाहीतर अभ्यासकांचा फायदा व्हावयाच्या ऐवजी वेळ मात्र वाया जावयाचा!

इतरांनी हाती घेतलेल्या उपक्रमांमधील उणिवा दाखविण्याचे कार्य किती सोपे पण क्लेशकारक असते, याचा अनुभव हा लेख संपविताना मी घेतला. तथापि अभ्यासकांचे हित व प्रत्येक कार्यात अपेक्षित असलेली सुधारणा जमेस धरूनच हे दायित्व मी पत्करले!

## संदर्भ-टीपा

१. घोंड, मधुकर वासुदेव...प्राचीन मराठीचा पहिला वाङ्मयकोश.
म. सा. प., जुलै-डिसें. १९७८ अं. २०६ व २०७, पृ. ७१
२. Collison, R. L...Bibliographies, Subject and National, London, Crosby Lockwood and Son, 1951, P. 3
३. UNO...Bibliographical Style Manual, New York, UNO, 1963, P. 1-2.
४. दाते, शंकर गणेश...मराठी-ग्रंथ-सूचि, (१८००-१९३७), पुणे, शंकर गणेश दाते, १९४३, पृ. ३६.

# ४

# साहित्यपत्रिका आणि मी

## श्रीकृष्ण केशव क्षीरसागर

परिषदेचा आणि माझा संबंध माधवराव पटवर्धन सभागृहाकरिता निधी गोळा करण्याच्या निमित्ताने १९४०–४१ साली आला. या कार्यात पुढाकार अर्थात विठ्ठलराव घाटे यांचा होता. खिस्तवासी रावसाहेब रघुवेल लुकस जोशी हे त्या वेळी परिषदेचे चिटणीस होते. या पूर्वी माझा संबंध शारदामंदिराशी होता. त्याचे पुढारी आचार्य अत्रे हे होते. माधवरावांच्या स्मारकाच्या निमित्ताने परिषदेशी संबंध आल्यावर र. लु. जोशी, वा. दा. गोखले, वगैरे परिषदेचे कार्यकर्ते, मी परिषदेच्या कामात अधिक लक्ष घालावे, असे म्हणू लागले. पण ह्या वेळपावेतो, म्हणजे १९४१–४२ पर्यंत, मी परिषदेचा साधा सभासदही नव्हतो. विशारदच्या विद्यार्थ्यांपुढे व्याख्याने देणे, साहित्यपत्रिकेमध्ये लेख लिहिणे, ही मला सुचविण्यात आलेली पहिली कामे होती. लवकरच पत्रिकेकरिता नवीन संपादक निवडण्याची वेळ आली आणि के. नारायण काळे यांची नियुक्ती झाली. पण या नियुक्तीच्या वेळीच आचार्य अत्रे यांचे मित्र व ज्ञानप्रकाशचे संपादक काकासाहेब लिमये माझ्याकडे आले असता, मी पत्रिकेचे संपादकत्व पत्करू शकेन काय, याची चाचपणी करीत होते असे स्मरते. त्या वेळी मला तेवढा आत्मविश्वास नव्हता, म्हणून मी नकार दिला. कारण संपादकत्व म्हणजे नुसते लेखन नव्हे. वेगवेगळे लेखक, पत्रिकेचा सेवकवर्ग, छापखान्यातील वातावरण, सर्वांशी संपादकाचा संबंध येणार व हे माझ्या स्वभावाला मानवण्यासारखे नव्हते. म्हणजे १९४१ च्या सुमारालाच पत्रिकेचे संपादकत्व स्वीकारावे काय, याचा मला विचार करावा लागला होता. के. नारायण काळे यांनी ते संपादक होताच मला पत्रिकेकरिता लिहायला मात्र लावले.

यानंतर वेगवेगळ्या नात्यांनी माझा साहित्यपरिषदेशी संबंध वाढत गेला असला, तरी संपादकत्व स्वीकारण्याचा विषय माझ्यापुढे कोणी मांडलेला नव्हता; व माझ्याही डोक्यात तो विचार कधी आलेला नव्हता. १९५९ मध्ये मी साहित्यसंमेलनाचा अध्यक्ष निवडला गेलो. त्यानंतर कार्याध्यक्ष म्हणूनही मी काम केले. के. नारायण काळे

कार्याध्यक्ष झाल्यावर मी संपादकत्व पत्करावे, असा त्यांनी आग्रह केला. १९४१ च्या सुमाराला मला या कामात जी अडचण वाटत होती, ती आता अधिकच तीव्रतेने जाणवत होती. कारण त्या वेळी मी अननुभवी होतो, तर आता मी कार्यव्यापृत होतो. 'टीकाविवेक' या ग्रंथाचे माझे लेखन चालू होते. पण 'छापखाना, लेखकांशी पत्र-व्यवहार, वगैरे कटकटीची कामे मी स्वतः उरकीन किंवा परिषदेची कचेरी उरकेल; तुम्ही संपादकीय मजकूर देणे व लेखांची निवड करणे, एवढे केले तरी पुरे आहे' असे म्हणून काळे यांनी पत्रिकेचे संपादकत्व अखेर माझ्या गळ्यात घातले.

अर्थात, नाही म्हणता म्हणता मला संपादकाला करावी लागणारी आनुषंगिक कामेही प्रसंगोपात्त करावी लागत. पण, माझ्या दृष्टीने मी पत्रिकेच्या स्वरूपात जर थोडे वेगळेपण आणले असेन तर ते माझ्या संपादकीयांनी होय. तोवर संपादकीयात दुखवटा, वाढदिवस, अधिकारान्तर हे विषय आणि तेही अगदी तांत्रिक स्वरूपात येत असत. त्यात विषयांची विविधता, किंवा येतील त्या ठराविक विषयांची वाङ्मयीन आणि सांगोपांग मांडणी हे क्वचितच असे. मी त्या संपादकीयांना खऱ्याखुऱ्या संपादकीयांचे स्वरूप दिले, असे मला वाटते. फ्रेंच लेखक सार्त्र, पंडित जवाहरलाल नेहरू वगैरेंवरील माझी स्फुटे या संदर्भात मला स्मरतात.

पण संपादकत्व म्हटल्यावर केवळ संपादकीय लेखनाने कसे भागणार? छाप-खान्याच्या किंवा इतर कटकटी न उद्‌भवल्या तरच आश्चर्य! छापखाना बदलण्या-संबंधी अनेक बाजूंनी दबाव येत. अर्थात, ते बहुधा छापखान्यांच्या चालकांकडूनच येत. पण ते नुसते मुद्रक नसत, तर परिषदेच्या कारभाराशीही त्यांचा संबंध असे. मी असल्या व्यावहारिक सूचनांकडे दुर्लक्ष केले तर माझ्यावर दुर्बलपणाचा आरोप येई. त्याकडे लक्ष दिले तर एखाद्या मुद्रकाच्या बाबतीत संपादकाचे हितसंबंध गुंतलेले आहेत, अशीही शंका निघे. म्हणजे 'केवळ संपादकत्व' अशी चीज नाही, हे माझ्या अनुभवाला येई. इतरही अनेक कटकटींना संपादकास तोंड द्यावे लागते, याचा मला अनुभव आला. तरीही प्रकृती सांभाळून हे काम यथाशक्ती मी पुरे केले.

## साभार स्वीकार

गोखले श्री. पु. (संपा.) : भाल्याची फेक; केसरी प्रकाशन, पुणे ३०; रु. २५.

कुलकर्णी श्यामकांत : झरोका; माग्रस प्रकाशन, नागपूर, रु. ४

निमखेडकर मालती : अश्लेषा; माग्रस प्रकाशन, नागपूर, रु. ४.

५

# साहित्य-पत्रिकेचे माझे संपादन

**वामन रावजी ढवळे**

' महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका ', वर्ष २९, अंक ११३ पासून वर्ष ३३, अंक १३६ पर्यंत म्हणजे एकंदर सलग अशी सहा वर्षे ( एप्रिल १९५५ ते मार्च १९६१ ) मी, पत्रिके 'चे संपादन केले. अगदी काटेकोरपणानेच लिहावयाचे झाले तर वर्ष ३६ अंक १४६–१४७, जुलै १९६३ ते डिसेंबर १९६३ या कालावधीचा म्हणजे सहा महिन्यांचा एक जोड अंकही माझ्याच संपादनाने प्रसिद्ध झालेला आहे. कारण संपादक श्री. दि. के. बेडेकर यांनी ' पत्रिके 'चे एक वर्षभर संपादन केल्यावर संपादकत्वाचा राजिनामा दिला. मी संपादक-मंडळावर होतोच. त्यामुळे कार्यकारी मंडळाने त्यांच्या जागी १४६–१४७ या अंकापुरती संपादक म्हणून माझीच नियुक्ती केली. काम अडू द्यायचे नाही याच हेतूने मी ती जबाबदारी स्वीकारली व अंक १४८ पासूनचे संपादन करण्यासाठी श्री. श्री. के. क्षीरसागर यांना वाट मोकळी करून दिली.

माझ्या आधीच्या अंकात कविता, कथा, लघुनिबंध हे ललित वाङ्मयप्रकारही ललितेतर वाङ्मयप्रकारांच्या जोडीने प्रसिद्ध झालेले आढळून येतील. ' पत्रिके 'च्या अंकांची मर्यादित पृष्ठसंख्या लक्षात घेतली तर ललित वाङ्मयाचे विविध प्रकार समाधानकारक प्रमाणात ( संपादक व वाचक या दोघांच्याही दृष्टीने ) प्रसिद्ध करणे कठीण जाते. संपादकांची होत असलेली ही कुचंबणा माझ्या दृष्टीला येत होती. वास्तविक ललित वाङ्मयाचे विविध प्रकार विपुलतेने प्रसिद्ध करून मराठी वाचकांची कलात्मक भूक भागविण्याचे कार्य समर्थतेने करणारी त्या वेळी अनेक मासिके पुण्या-मुंबईत व इतरत्रही प्रसिद्ध होत असताना व ते कार्य मोठ्या आस्थेने, आवडीने नि उत्साहाने ती मासिके करीत असताना, ' पत्रिके 'नेही तेच कार्य अगदी अत्यल्प प्रमाणात करण्यात फारसे स्वारस्य अगर औचित्यही नाही, असे मला तीव्रतेने वाटू लागले होते. या विचार-मंथनातूनच महाराष्ट्र साहित्य परिषदेचे मुखपत्र असलेल्या ' पत्रिके 'चे स्वरूप चर्चात्मक, समीक्षणात्मक वाङ्मयाच्या प्रसिद्धीपुरतेच मर्यादित

ठेवावे हा विचार पक्का झाला व तो मी माझ्या पहिल्याच संपादकीयात जाहीर करून टाकला. महाराष्ट्रातील विचारवंत लेखकांचे व समीक्षकांचे सहकार्य मला मिळेल व ' पत्रिके 'चे जे उद्दिष्ट मी माझ्या डोळ्यांपुढे ठेविले होते ते सफल होईल ही मला आशा होती. ' पत्रिके 'चे नवीन स्वरूप आवडल्याचे कळविणारी अनेक पत्रे अंक प्रसिद्ध होताच मला आली.

लेखकांचे साहाय्य हे एका अर्थाने माझे भांडवल होते. शिवाय परिषदेच्या कार्यकारी मंडळावर निवडून आलेली सर्वच मंडळी माझ्या पूर्ण परिचयाची होती. संपादक मंडळावर सर्वश्री यशवंतराव पेंढरकर, श्री. के. क्षीरसागर, वा. ल. कुळकर्णी व अरविंद मंगरूळकर यांची नियुक्ती झाल्यामुळे व या सर्वांनाच माझ्याबद्दल आपलेपणाची भावना वाटत असल्यामुळे, त्यांचे साहाय्य हा माझा एक फार मोठा आधार होता. या आधाराच्या जोरावरच ' पत्रिके 'च्या संपादनाची जबाबदारी मी स्वीकारू शकलो. अर्थात ती जबाबदारी स्वीकारण्यापूर्वी, लेखकांना त्यांच्या लेखनाबद्दल अल्प का होईना, प्रतीकात्मक मानधन देण्याचे माझे धोरण कार्यकारी मंडळाला मी विदित केले होते. ' पत्रिकेचे 'चे प्रकाशन घट सोसूनही साहित्य परिषद करीत आली होती याची मला जाणीव होती. अशा परिस्थितीत ' पत्रिके 'त प्रसिद्ध होणाऱ्या लेखांना मानधन दिल्यास ती घट निश्चितच वाढणार होती. म्हणून ' पत्रिके 'साठी काही जाहिराती मिळवून वाढीव खर्चाची तोंड मिळवणी करण्याचे कार्यकारी मंडळाला आश्वासन देण्याव्यतिरिक्त मला दुसरा मार्ग उपलब्ध नव्हता. लेखकांना त्यांच्या लेखनाबद्दल मानधन दिले पाहिजे हे तत्त्व कार्यकारी मंडळाच्या सर्वच सभासदांना मान्य होते. फक्त ते देण्यासाठी पैसा कसा उभा करायचा हाच प्रश्न होता. पण मी दिलेल्या आश्वासनाने तोही प्रश्न निकालात निघाला.

पण तब्बल सहा वर्षांच्या संपादकीय अनुभवानंतर मी आता या निष्कर्षापर्यंत आलो आहे की, ' पत्रिके 'च्या संपादकपदावर पुण्याच्या स्थानिक व्यक्तीचीच नियुक्ती होणे इष्ट होईल. कार्याध्यक्ष व कोषाध्यक्ष या पदावर पुण्याच्याच व्यक्ती असल्या पाहिजेत अशी परिषदेच्या घटनेत जशी तरतूद ( provision ) करण्यात आलेली आहे तशी तरतूद ' पत्रिके ' च्या संपादक-पदाचीही करण्यात यावी. तसे झाल्यास ' पत्रिके 'च्या संपादनाकडे व मुद्रणाकडेही साक्षात लक्ष देणे संपादकाला सोयीचे होईल व परिषदेचा अवांतर होणारा पत्रव्यवहार व त्याप्रीत्यर्थ होणारा अकारण टपालखर्चही टाळता येईल. जुन्या-नव्या लेखकांनाही संपादकांची भेट दिलेल्या वेळात घेता येईल. मशीनवर टाकलेल्या फर्म्यांची मुद्रिते संपादकाला डोळ्यांखालून घालता येतील व संभाव्य चुकाही टाळता येतील.

' पत्रिकेची 'ची संपादकीय सूत्रे हाती घेतल्यावर ' पत्रिके 'च्या अंतर्बाह्य स्वरूपात बदल करण्याचा मी प्रथम प्रयत्न केला. अंकाचे नुसते मुखपृष्ठच बदलून टाकले असे

नसून ते अधिक आकर्षक केले. 'पत्रिके'च्या अंतरंगाचे स्वरूप चर्चात्मक, संशोधनात्मक करण्याचा प्रयत्न केला. 'पत्रिके'तील लेखांना अल्प का होईना, मोबदला देण्याची प्रथा सुरू केली. साहित्य परिषदेत वर्षातील वाङ्मयाचे समालोचन ठरणारी व्याख्याने प्रतिवर्षी घडवून आणण्याची योजना कार्यवाहांनी आखून त्याप्रमाणे व्याख्याने दिली जात होती. पण वाङ्मयाच्या कथा, कादंबरी, काव्य, नाटक, चरित्र आत्मचरित्र, ललित गद्य, टीका, वगैरे प्रकारांची प्रतिवर्षी जी वाढ होत होती व त्या प्रकारांत जी विपुल ग्रंथ-रचना होत होती, त्यांची समालोचने वर्षाच्या बहुधा शेवटच्या, म्हणजे चौथ्या अंकात प्रसिद्ध करण्याची एक योजना मी आखली होती. पण ती ती प्रत्यक्षात आणण्यासाठी आर्थिक साहाय्याची अपेक्षा होती.

'पत्रिके'च्या स्वरूपात बदल करून, ते स्वरूप चर्चात्मक, संशोधनात्मक, समीक्षणात्मक ठेवण्याचा जो मी सुरुवातीलाच निर्णय घेतला, त्या निर्णयाबद्दल पश्चात्ताप करण्याची केव्हाही पाळी माझ्यावर पुढे आली नाही, अगर त्या निर्णयाचे पालन करण्यात अडचणीही आल्या नाहीत.

वानगीदाखल विषयांची व लेखकांची काही नावे उद्‌धृत करणे अपरिहार्य आहे. संशोधनपर लेखांचा उल्लेख करावयाचा झाल्यास, 'संस्कृत आणि मराठी मृच्छकटिक' (म. म. वा. वि. मिराशी), 'संस्कृत कोशांतील संस्कृती' (न. र. फाटक), 'नरीन्द्राचा प्रतिभाविलास' (सुरेश डोळके), 'पंढरपूर विठ्ठलमंदिराच्या इतिहासातील एक अज्ञात दुवा' (शं. गो. तुळपुळे), 'पुनश्च पंढरपूर शिलालेख' (शं. गो. तुळपुळे), 'मराठी नामोच्चारित छंद,' 'मराठीतील केवल पद्य ओवी' (चैतन्य देसाई), 'संतोष मुनीकृत लघु रुक्मिणी सैंवर', 'मुक्तेश्वराचे भावार्थ रामायण' (वसंत स. जोशी), 'वेरूळच्या लेण्यात हसन गंगू बहामनी' (न. शं. पोहोनेरकर), 'शकार्थावर अभिनव प्रकाश' (कृ. मो. शेंबवणेकर) 'मुकुंदराजाची परंपरा', 'मुक्तेश्वरावर प्रकाश' (पंडित आवळीकर) इत्यादी अनेक लेखांनी संशोधनाचे दालन समृद्ध केलेले आढळून येईल. संशोधनात्मक लेखांप्रमाणेच गं. ब. ग्रामोपाध्ये यांचे भाषाशास्त्रासंबंधीचे लेख, र. वि. हेरवाडकरांचे बखर वाङ्मयाच्या स्वरूपासंबंधीचे लेख, मराठी भाषेच्या अभ्यासासंबंधी ना. गो. कालेलकरांचे लेख, दाजी नागेश आपटे, आचार्य जावडेकर यांच्यासंबंधी अनुक्रमे चिं. वि. जोशी व प्रभाकर पाध्ये यांचे लेख, 'ललित वाङ्मयाचे प्रयोजन' (वा. ल. कुळकर्णी), 'वाङ्मयातील प्रतीकवाद' (कृ. पां. कुलकर्णी), 'सावरकरांचे कवित्व' (भ. श्री. पंडित), 'साहित्य समीक्षेसंबंधी काही विचार' (कुसुमावती देशपांडे), 'गोविंदराव टेंबे' यांच्यासंबंधी वि. स. खांडेकरांचे तीन लेख, 'साहित्यातील आग्रह व दुराग्रह' (वि. वा. शिरवाडकर), 'राष्ट्रकवी रवींद्रनाथ टागोर' (श्री. के. क्षी.) वगैरे चर्चात्मक, समीक्षणात्मक लेखांनी 'पत्रिके'चा वाङ्मयीन दर्जा व 'पत्रिके'चे महत्त्व

वाढविलेले आहे. अंक क्र. १३५ (ऑक्टो. ते डिसेंबर १९६०) मधील साहित्य-समीक्षात्मक लेख व क्र. १३६ (जाने. ते मार्च १९६१) मधील साहित्य समालोचन यांमुळे वाङ्मयसमीक्षेचे दालन समृद्ध झालेले आहे. त्याचप्रमाणे टागोर जन्मशताब्दीच्या वेळी प्रसिद्ध झालेला माझ्या संपादकीय कारकीर्दीतील शेवटचा अंक गुरुदेव टागोरांच्या स्मृतीस अर्पण करण्याचे औचित्य साधून गेला. याच अंकात काव्य (वि. वि. पटवर्धन), नाटक (ज्ञानेश्वर नाडकर्णी), टीकावाङ्मय (गो. म. कुलकर्णी), कादंबरी (शंकर पाटील), 'आजचे ललित गद्य' (वा. ल. कुलकर्णी), लघुकथा (सुधीर रसाळ), बालवाङ्मय (शंकर सारडा), चरित्रे-आत्मचरित्रे (र. वि. हेरवाडकर) वगैरे वाङ्मयप्रकारांचे १९६० सालातील पुस्तकांवरील साहित्य समालोचन उल्लेखनीय आहे. याच अंकात सा. तु. याज्ञिक यांनी १९५९–६० सालातील गुजराती वाङ्मयाचे केलेले समालोचन, कमलाकांत पाठक यांनी १९५९–६० सालातील हिंदी साहित्याचे केलेले समालोचन लक्षात घेतल्यास 'पत्रिके'ने 'आंतरभारती'-च्या क्षेत्रात अगदी नव्यानेच प्रवेश करून आपले व्यवच्छेदक वैशिष्ट्यही प्रकट केलेले आहे हे दिसून येईल. इ. स. १९६० सालातील 'मराठी ग्रंथ-सूची' म. श्री. दीक्षित यांनी मोठ्या परिश्रमाने तयार करून ती वाङ्मय-समालोचकांकडे पाठविली होती. ती सूचीही या शेवटच्या अंकाला जोडलेली आढळून येईल.

'पत्रिके'ची संपादकीय सूत्रे इ. स. १९५५ साली मी हाती घेतल्यावर ज्या प्रथा सुरू केल्या त्या आजही अधिक जोमात सुरू आहेत याचा मला जितका आनंद वाटतो तितकाच अभिमानही वाटतो. काम करू लागले की, ते पैशाविना अडून राहत नाही. कुठून नाही कुठून तरी पैसा उपलब्ध होतो हा माझा आजवरचा अनुभव आहे. संयुक्त महाराष्ट्राची निर्मिती होऊन माननीय यशवंतराव चव्हाण हे मुख्य मंत्री झाल्यावर वृत्तपत्रे व नियतकालिके यांच्या संपादकांची एक बैठक त्यांनी पुण्याच्या 'सर्किट हाऊस' वर घेतली होती. 'पत्रिके'च्या संपादकालाही त्या बैठकीत निमंत्रण होते. मी त्या बैठकीला उपस्थित राहून 'पत्रिके'च्या आर्थिक स्थितीची त्यांना कल्पना दिली होती. तिचा उपयोग झाल्याशिवाय राहिला नाही. "पत्रिके'ला सरकारी जाहिराती तर मिळू लागल्याच, पण समालोचन अंकांच्या खर्चासाठी शिक्षण व समाजकल्याण खात्याकडून रु. १५०० चे वार्षिक अनुदानही पुढे मिळू लागले. 'पत्रिके'च्या गेल्या पाच-सहा वर्षांतील अंकांचे स्वरूप मोठे विलोभनीय झालेले आढळून येते. छपाई, सजावट, योजना, पृष्ठसंख्या, लेखकांचे मानधन, संपादन या सर्वच बाबतींत उत्तरोत्तर प्रगती होत आहे हे पाहून धन्यता वाटते. 'पत्रिके'च्या प्रगतीची इमारत उभी राहत असताना त्या इमारतीच्या उभारणीला आपलाही थोडाफार का होईना, हात लागलेला आहे याची आज आठवण झाली की, मन आनंदाने नि अभिमानाने उचंबळून आल्याशिवाय राहत नाही !

# ६

# दि. के. बेडेकरांनी केलेले पत्रिकेचे संपादन

## सुधीर दि. बेडेकर

एप्रिल १९६१ ते एप्रिल १९६३ या काळात कै. प्रा. दि. के. बेडेकर महाराष्ट्र-साहित्य-पत्रिकेचे संपादक होते. पत्रिकेत या काळात प्रसिद्ध झालेल्या वाङ्मयाचे समालोचन करायचे तर त्यासाठी पत्रिकेच्या उद्दिष्टांविषयी व कार्याविषयी एक विशिष्ट दृष्टिकोन जवळ असणे प्रथमतः आवश्यक आहे. महाराष्ट्र-साहित्य-परिषदेचे स्थान महाराष्ट्राच्या सांस्कृतिक-साहित्यिक जीवनात काय आहे, परिषदेचे नेमके कार्य कोणते, हे ठरवले तर पत्रिकेचे स्वरूप काय असावे याबद्दल काही निश्चित भूमिका ठरवता येईल.

या संदर्भात प्रा. दि. के. बेडेकरांनी आपल्या पहिल्या संपादकीयात काही विवेचन केलेले आहे, ते महत्त्वाचे वाटते. ( वर्ष ३४ : अंक १३७ : पृ. १ ) त्या विवेचनाला जोडून असे म्हणता येईल की, मराठी भाषा व मराठी साहित्य यांच्या क्षेत्रात विविध संशोधन-केंद्रे, विद्यापीठे व महाविद्यालये यांचे कार्य, चिकित्सा, संशोधन व व्यासंग वाढला पाहिजे. सर्वसामान्यांपर्यंत साहित्य-विषयक व भाषाविषयक माहिती व ज्ञान पोचवणे, लोकांच्या रसिकतेला प्रगल्भ बनवणे, असे साहित्यासंबंधी प्रबोधनाचे कार्य साहित्यसंस्थांचे आहे. ज्या पातळीवर व ज्या प्रकारे संशोधक, प्राध्यापक वा विद्यार्थी कार्य करतात, त्याऐवजी परिषदेने सामान्य वाचकांशी सांधा जोडायला हवा. ' नवशिक्षित लोकांच्या मानसात होत असलेले हे संक्रमण निकोप कसे राहील व वर्धिष्णू कसे होईल याचीच चिंता साहित्यसेवकांनी वहायला हवी, ' असे प्रा. बेडेकर म्हणतात. जनतेकडून कर रूपाने घेतलेला पैसा शासन या संस्थांना देते, तो त्यांनी मूठभर ' व्यावसायिक साहित्यिकां 'च्या गटांसाठी कार्य करावे म्हणून नव्हे, तर जनतेला साहित्यिक क्षेत्रात प्रवेश व वाव मिळावा म्हणून.

या दृष्टिकोनातून पाहता खालील चारपाच गोष्टींवर पत्रिकेचा भर असायला हवा. ( १ ) समकालीन साहित्याकडे पाहण्याची प्रगल्भ रसिक वृत्ती सर्वसामान्यांमध्ये निर्माण व्हावी याकरिता साहित्याची रसग्रहणपर समीक्षा व परिचय करून देणे, (२)

मराठी वाङ्मयाच्या व ज्या मातीतून ते जन्मते तिच्या परंपरांचा परिचय करून देणे, (३) मराठीची एक भाषा म्हणून ओळख करून देणे व तिच्या भाषाव्यवहारातील प्रश्नांचे विवेचन करणे, (४) इतर भारतीय भाषांमधील साहित्याची ओळख करून देणे, (५) साहित्य व समाज यांच्या सीमारेषेवरच्या अश्लीलता, दुर्बोधता, मराठीचे अध्यापन, शुद्धलेखन इत्यादी प्रश्नांबाबत चर्चा करणे.

या विषयांबद्दलचे विवेचन, प्रश्नांची हाताळणी हीसुद्धा विशेष प्रकारेच पत्रिकेमध्ये असायला हवी. 'शालेय' चर्चेचे स्वरूप तिला असता कामा नये, तर सर्वसामान्य वाचकाला/रसिकाला या सर्व गोष्टींमध्ये रस वाटेल व त्याला विवेचन कळू शकेल, अशाच प्रबोधक पद्धतीचे लेखन पत्रिकेत असणे आवश्यक आहे.

या दृष्टिकोनातून १९६१ ते १९६३ या काळातील पत्रिकेतील वाङ्मयाचा परामर्श घेण्याआधी एक मर्यादा स्पष्ट करायला हवी. या कालखंडातील साहित्यजीवनातील प्रवाह, उद्भवलेले वाद व समस्या इत्यादींचा 'भावपरिचय' (इंग्रजीत ज्याला 'फील' म्हणतात) प्रस्तुत लेखकास नाही. गेल्या दहा वर्षांत मराठी साहित्यक्षेत्र एवढे बदलले आहे की, त्यावरून १९६० च्या सुमाराचे वातावरण ताडणे कठीणच आहे. थोडेफार असे म्हणता येईल की, प्रस्थापित जुने साहित्य व १९६५ नंतरचे बंडखोर, प्रयोगशील आणि/किंवा श्रमिक व दलित साहित्य या दोन्हींच्या मधला हा काळ होता. सामाजिक जीवनातदेखील १९६० पर्यंतची संयुक्त-महाराष्ट्र-चळवळ व प्राथमिक आर्थिक विकास आणि १९६७ नंतरची आर्थिक दुरवस्था व राजकीय-सामाजिक जनआंदोलने, यांच्यामधला तात्कालिक शांततेचा हा काळ होता. परंतु साहित्यक्षेत्राचे प्रत्यक्षातील तपशील यावरून माहीत होत नाहीत. असो.

वर मांडलेल्या पाचही मुद्यांच्या संदर्भात एक सर्वसाधारण असमाधान प्रथम व्यक्त करावेसे वाटते. पत्रिकेच्या या दोन वर्षांतल्या तरी मजकुराची मांडणी बहुतांशी शालेय स्वरूपाची आहे. वाचकामध्ये आस्था व रस उत्पन्न करायचा आहे, त्याला जे फारसे माहीत नाही ते त्याला सांगायचे आहे, अशा प्रकारे हाताळणी, मांडणी व शैली फारच थोड्या मजकुरात आहे. थोडक्यात : साहित्यसेवकांनी लोकांसाठी लिहिलेले हे लिखाण वाटत नाही, तर एका प्राध्यापकाने दुसऱ्या प्राध्यापकासाठी लिहिलेले ते निबंध वाटतात. याला अपवाद आहेत, पण फारशा संख्येने नाहीत.

समकालीन वाङ्मयासंबंधीचे खास लेख या दोन वर्षांत अत्यंत थोडे आहेत. किंबहुना, एप्रिल १९६३ चा खास वाङ्मय-समालोचन अंक वगळता असे लेख नाहीतच असे म्हणावे लागते. साहित्य–समीक्षा या सदरात चालू साहित्याचा परामर्श घेण्याची पद्धत या काळात चांगल्या तऱ्हेने वापरलेली आहे. विविध प्रकारच्या अनेक पुस्तकांचा परामर्श प्रथितयश जुन्यानव्या समीक्षकांनी घेतलेला आहे. परंतु एका पुस्तकावर एकदीड पाने अशा या समीक्षेतून वाचकाची दृष्टी घडवण्याबाबत

परिणामकारक कार्य कितपत होऊ शकते हा प्रश्न आहे.

मराठी सामाजिक व वाङ्मयीन परंपरांचे ज्ञान वाचकाला देण्याबाबत या अंकांमधला मजकूर फारच निराशाजनक आहे. किंबहुना, चोंभा कवी, विष्णुदास, विश्वनाथ, पद्मनाभ अशा प्राचीन कवींवर संशोधनपर निबंध जास्त आहेत. बालकवींवरचा एक लेख वगळता, मराठी अभिरुची व वाङ्मय, विचार व समाज यांचा इतिहास कोठेही आलेला नाही. हे संशोधनपर लिखाण उत्कृष्ट आहे. कदाचित त्या वेळी प्रबोधन हा हेतूच गौण मानला गेला असावा.

त्या मानाने मराठी भाषेसंबंधीचे प्रश्न—ग्रामीण भाषा, शुद्धलेखनाची समस्या, पदनामकोशाच्या निमित्ताने परिभाषेची समस्या–चांगले हाताळलेले आहेत.

भारतीय भाषांमधील साहित्यासंबंधीचे लेख हा या काळात पुष्कळ विकसित झालेला चांगला विभाग आहे. रवींद्रशताब्दीच्या निमित्ताने रवींद्रसाहित्याबद्दल, मैथिलीशरण गुप्त व त्रिपाठी या हिंदी लेखकांबद्दल, कन्नड साहित्याचे समालोचन करणारा, बंगाली साहित्यविषयक, इ. लेख प्रसिद्ध झालेले आहेत.

साहित्य व समाज यांच्या सीमेवरचे प्रश्न फारसे घेतलेले नाहीत. मात्र 'शुद्धलेखनाचे समाईक नियम' या प्रश्नासंबंधी महत्त्वाचा मजकूर आहे. या प्रश्नासंबंधी संपादकांना विशेष आस्था असल्याचे त्यावरून दिसते. तसेच साहित्यिकांचे व साहित्यक्षेत्रातले व्यावहारिक प्रश्नदेखील वार्तापत्रे, संपादकीय, टिपणे, इ. मधून हाताळलेले आहेत. म. सा. परिषदेचे मुखपत्र म्हणून संस्थेच्या कार्याचे वृत्तही अर्थातच आलेले आहे. समाजातील व भाषा-साहित्याच्या क्षेत्रांतील वेगवेगळ्या घटनांचे अतिशय सजग व सूक्ष्म वृत्ती ठेवून टिपण करणारी प्रा. दि. के. बेडेकरांची संपादकीय टिपणे त्या काळाचा 'फील' येण्याच्या दृष्टीने व त्यांच्यातील स्फुट विचारांसाठीही महत्त्वाची आहेत.

एकंदरीत पाहता, वरील त्रोटक पाहणीवरून तरी, म.सा.पत्रिका, तिने जे करायला हवे होते ते करण्याच्या दृष्टीने, ( निदान ) त्या दोन वर्षांत फारशी समाधानकारक वाटत नाही. याला अनेक कारणे असू शकतात. कोणत्याही प्रस्थापित संस्थेला एक स्वयंगती '—किंवा स्थितिशीलताच खरे म्हणजे—आलेली असते. संपादकीय धोरण, प्रबोधक लेखकांची उपलब्धता, संस्थात्मक/संघटनात्मक बंधने व संघर्ष, सर्वसामान्य वाचक व परिषद यांच्यातील संबंधांचे जेवपण इत्यादी घटकांमुळे पत्रिकेतील मजकुराचा साचा ठरणार. ह्या सर्व अंगांचा खोलवर विचार केल्याखेरीज, पत्रिका व परिषद स्वतःचे उद्दिष्टकार्य करू शकणार नाही. आजच्या काळातदेखील त्या प्रश्नांचा विचार महत्त्वाचा आहे व तो करणे आजही आवश्यक आहे असे वाटते.

# ७

# डॉ. कोलते आणि साहित्य-पत्रिका

**सुधाकर केशव भोसले**

---

डॉ. विष्णू भिकाजी कोलते यांनी महाराष्ट्र-साहित्य-पत्रिकेच्या एकंदर बारा अंकांचे संपादन केले. वर्ष २५, अंक १०१ ते वर्ष २८, अंक ११२ म्हणजे, एप्रिल १९५२ ते मार्च १९५५ हा त्यांच्या संपादकीय कारकीर्दीचा कालखंड आहे. डॉ. कोलते यांच्या संपादक-मंडळात डॉ. के. ना. वाटवे, प्रा. शं. के. कानेटकर ऊर्फ कविवर्य गिरीश, प्रा. म. ना. अदवंत आणि डॉ. सरोजिनी वाबर हे पाच सदस्य आहेत.

## पत्रिकेचे स्वरूप

पत्रिकेच्या अंकातील कविलेखकांची अगदी थोडक्यात ओळख, ( बहुधा मलपृष्ठ दोनवर ) करून दिली जाई. कविता, लघुनिबंध, लघुकथा, संशोधनात्मक लेख, समीक्षा, विवेचनपर लेख, भाषाशास्त्रीय लेख, ग्रंथपरीक्षणे, संपादकीय, यांशिवाय परिषदवार्ता अशी सदरे असत. तसेच महत्त्वाचे ठराव, पुस्तकांची साभार पोच, नवीन सभासदांची यादी, वाचकांची पत्रे असा स्थूल मानाने पत्रिकेतील मजकूर असे. हे सारे साहित्य प्रत्येक अंकात सामान्यतः साठ पृष्ठांत समाविष्ट झाले आहे. दोन अंक ४४ पृष्ठांचे ( अं. ११०, अं. १११ ) असून सर्वात मोठा अंक ७६ पृष्ठांचा ( अं. १०८ ) आहे.

## कविता, लघुकथा व लघुनिबंध

आता पत्रिकेच्या अंकात कवितेला स्थान नाही. पण या कालखंडातील प्रत्येक अंकात सामान्यतः पाच-सहा कविता आहेत. अंकाची सुरवातच कवितेपासून होते. या कविता एकत्रित छापल्या आहेत. काही कविता मात्र पानपूरकाप्रमाणे लेखाच्या खाली, उरलेल्या जागेत छापलेल्या आहेत.

कविमंडळींत यशवंत, गिरीश, भवानीशंकर पंडित, राजा बढे, ग. ह. पाटील, राजकवी काळेले, कुसुमाग्रज, शरच्चंद्र मुक्तिबोध, मंगेश पाडगावकर, पंडित आवळीकर,

म. म. देशपांडे. पी. सावळाराम, सूर्यकांत खांडेकर इ. मातब्बर कवी आढळतात.

एकूण अंकांतील कथा ( वामनराव चोरघडे अंक १०१ ), लघुनिबंध ( वि. स. खांडेकर अं. १०५ आणि शांताराम अं. १०४ ) यांची संख्या अगदी अत्यल्प आहे. कुसुमावती देशपांडे यांची एक चिंतनिका आहे. ( अं.१०२ )

## संशोधनपर आणि भाषाशास्त्रीय लेख

संशोधनपर लेखांची संख्या फार नाही. परंतु लेख मात्र व्यासंगपूर्ण आहेत. प्रा. सुरेश डोळके यांचे 'मुकुंदराजांचा स्थलनिर्णय' यावर तीन लेख आहेत. डॉ. शं. गो. तुळपुळे यांचा 'सावरगावातील तीन शिलालेख' ( सोबत शिलालेखांच्या आर्टप्लेट्स ) हा प्रदीर्घ लेखही महत्त्वाचा आहे. हरिव्यास सोंगोव्यास यांचे 'अन्वयस्थळ' ( महानुभाव वाङ्मयाच्या इतिहासातील प्रमुख तीन साधनांपैकी एक ) डॉ. वि. भि. कोलते यांनी संपादित करून मराठी वाङ्मयाच्या अभ्यासकांपुढे सादर केले आहे.

भाषाशास्त्रीय विभागात इ. ना. नेने यांचा एक, डॉ. अनुराधा पोतदार व डॉ. शं. गो. तुळपुळे यांनी संयुक्तपणे लिहिलेले दोन लेख आणि इतर दोन असे एकूण पाच लेख पत्रिकेत आहेत.

## समीक्षा

पत्रिकेतील समीक्षेच्या लेखांची संख्या भरपूर आहे. प्रत्येक अंकात सामान्यत: तीन तीन लेख आहेत. भा. वि. वरेरकर, इ. ना. नेने श्री. ना. बनहट्टी पु. य. देशपांडे, ग. त्र्यं. माडखोलकर, ना. ग. जोशी, कुसुमावती देशपांडे, द. के. केळकर, मा. गो. देशमुख, ग. त्र्यं. देशपांडे, महादेवशास्त्री दिवेकर, ना. सी. फडके, अ. ना. देशपांडे, द. सी. पंगू, भवानीशंकर पंडित, वि. ज. सहस्रबुद्धे, या. मु. पाठक प्रभृतींचे लेख समीक्षा-विभाग समृद्ध करतात. पातंजल महाभाष्याचा मराठी अनुवाद, लाँगिनसची साहित्यदृष्टी, भारतीय साहित्य, साहित्य-समीक्षेची परिभाषा, इंग्रजी वाङ्मयाचे इतिहास, मराठी वाङ्मयाचा इतिहास, केशवसुतांचे व्यक्तिमत्त्व आणि त्यांची निराशा, 'मराठी छंद', 'छंदोमंजरी' आणि 'छंदोरचना' इ. लेखांची शीर्षके समीक्षांतर्गत लेखांच्या विषयांची विविधता दर्शवितात.

याशिवाय ज्ञानेश्वरांची अकाली समाधी ( अं. १०१ ) हा द. के. केळकर यांचा लेख आणि त्यानंतर त्याच विषयावर पुढच्या अंकांतील ( अं. १०३,१०४ ) चार लेख व द. के. केळकरांचा समारोपात्मक लेख, नवकाव्यावरील चार लेख ( अं. ९१२ ) यांमधून एकाच विशिष्ट प्रश्नाचा सविस्तर विचार झालेला आढळतो.

## 'मराठीचिये नगरी'

पत्रिकेच्या अंकांतील डॉ. कोलतेलिखित 'मराठीचिये नगरी' हा संपादकीय

भाग अतिशय महत्त्वपूर्ण आहे. आपल्या संपादकत्वाखाली निघणाऱ्या पहिल्याच अंकात ( अंक १०१ ) थोडे आत्मनिवेदन करताना डॉ. कोलते म्हणतात, " महाराष्ट्र-साहित्य-पत्रिकेच्या संपादकाची जबाबदारी, परिषदेच्या कार्यालयापासून फार दूर अंतरावर राहणाऱ्या माझ्यासारख्याकडे सोपविली याबद्दल कार्यकारी मंडळाचे आभार मानणे माझे कर्तव्य आहे. कार्यकारी मंडळाने नेमलेल्या संपादक मंडळातील माझ्या सहकाऱ्यांच्या साहाय्याने व सहानुभूतीने पत्रिकेच्या प्रतिष्ठेला साजेल अशा रीतीने ही जबाबदारी पार पाडण्याचा मी अवश्य प्रयत्न करीन."

तिसऱ्या वर्षांच्या शेवटी समारोपात (अं. ११२ ) ते म्हणतात, "...महाराष्ट्र साहित्य परिषदेची कचेरी पुणे येथे असल्यामुळे पत्रिकेचे संपादन पुणे येथेच होणे सोयीस्कर होते. अशा परिस्थितीत बाहेरच्या सभासदांची या स्थानी योजना करून कार्यकारी मंडळाने दृष्टीचा विशालपणा व्यक्त केला त्याबद्दल त्यांचे अभिनंदन करणे आणि ही जबाबदारी माझ्या अंगावर टाकल्याबद्दल कृतज्ञता व्यक्त करणे मी माझे कर्तव्यकर्म समजतो. नागपूर येथे राहून हे काम पार पाडण्याचा प्रयत्न मी केला आहे. तो कितपत साधला हे परिषदेच्या सभासदांनी ठरवावयाचे आहे..."

पत्रिकेचे प्रसिद्धिस्थळ पुणे आणि डॉ. कोलते यांचे वास्तव्य मात्र नागपूरलाच असे संपादकीय वाचून वाटत नाही. किंबहुना, जेथे जेथे मराठी माणसे, मराठी भाषा, मराठी वाङ्मय आणि त्यावरील चर्चा, परिसंवाद, संमेलने तेथे तेथे डॉ. कोलते हे मनाने रमून होते, चिकित्सक दृष्टीने निरीक्षण करून मराठीच्या उज्ज्वल भवितव्या-संबंधी विचारविनिमय करीत होते असे दिसून येते. या दृष्टीने ते खरोखर ' मराठीचिये नगरी ' होते हे पटले.

डॉ. कोलते यांच्या ' मराठीचिये नगरी 'मध्ये श्रेष्ठ साहित्यिकांचे विशेष वाढदिवस ( एकसष्ठी, सत्तरी ), त्याबद्दल त्यांचे अभिनंदन आणि अभीष्टचिंतन, एखाद्या साहित्यिकाच्या निधनाबद्दल श्रद्धांजली, संमेलनांची इतिवृत्ते, अध्यक्षीय भाषणांतील विशेष मुद्द्यांचा ऊहापोह, निरनिराळ्या परिषदा, स्नेहसंमेलने यांच्या अध्यक्षपदी नियुक्ती झाल्याबद्दल त्या त्या व्यक्तींच्या साहित्यविषयक कामगिरीचे महत्त्व थोडक्यात विशद करून त्यांचे अभिनंदन, यांशिवाय मध्यप्रदेशात नाटकावरील करमणूक कराची सवलत, श्री. मोहनलाल भट्ट आणि मुंबई सरकारचे राज्यभाषाविधेयक इ. महत्त्वाच्या गोष्टींचे निर्देश आणि त्यावरील संपादकीय मते इ. गोष्टी येतात.

' मराठीचिये नगरी ' मध्ये मराठी भाषा आणि वाङ्मयाविषयी जे काही कार्य चालू आहे त्यांचे इतिवृत्त आणि त्यावरील संपादकीय भाष्य वाचत असताना डॉ. कोलते यांच्या दृष्टिकोणाचे हृद्य दर्शन होते. डॉ. कोलते यांना मराठी भाषा, मराठी वाङ्मय, या वाङ्मयातील सर्व प्रकार, ( तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांना त्यांच्या ' वैदिक संस्कृतीचा विकास ' या ग्रंथास भारत सरकारकडून पाच हजारांचे पारितोषिक मिळाले

म्हणून त्यांचे अभिनंदन करताना ' इतर भाषांतील ज्या ग्रंथांना पारितोषिके मिळाली आहेत ते बहुतेक ललित वाङ्मयाचे ग्रंथ आहेत या गोष्टीचा आमच्या ललित लेखकांनी अंतर्मुख होऊन विचार करावा. ' असे ते ललित लेखकांना जाता जाता सांगावयास ते विसरले नाहीत. ) श्रेष्ठ संशोधक, साहित्यिक यांच्याबद्दल आदर आणि मराठी भाषा बोलणारा बहुजनसमाज यांच्याबद्दल त्यांना विलक्षण कळवळा आहे.

मराठी भाषा ही सुंदर आहे, समर्थ आहे, कोणतीही भावना वा विचार व्यक्त करण्याची या भाषेची क्षमता आहे, असे डॉ. कोलते यांना वाटते. म्हणूनच इंदिरा संत यांनी एका अध्यक्षीय भाषणात ( अं. १०१ ) इंग्रजी शब्दांचा बेरेमाप वापर केला म्हणून डॉ. कोलते यांनी ' आमच्या एका श्रेष्ठ मराठी कवयित्रीचे आणि एका संमेलनाध्यक्षाचे मराठी भाषेतील हे प्रभुत्व वाखाणण्यासारखे आहे; नाही का ! ' अशा उपरोधपूर्ण शब्दांत संतांच्यावर टीका केली आहे.

काकासाहेब गाडगीळ यांनी नागपूर विदर्भ साहित्य संघाला भेट दिली, त्याप्रसंगी गाडगीळ म्हणाले, " मी ललित साहित्याच्या क्षेत्रात पाऊल टेवले नसले तरी मराठी भाषेचा मला अभिमान आहे. ' मराठी भाषा सोडायला तयार होशील तर तुला राष्ट्रपतिपद देईन. ' असा जर पेच कोणी मला टाकला तर मी ताबडतोब उत्तर देईन की, मी राष्ट्रपतिपद सोडीन, पण मराठी भाषा कदापि सोडणार नाही. " काकासाहेबांचे हे उद्गार उद्धृत करण्यात डॉ. कोलते यांचाही मराठी भाषाविषयक अभिमान व्यक्त होतो.

कोमल, नाजुक भावना, त्याचबरोबर गहन तत्त्वज्ञान तितक्याच समर्थपणे व्यक्त करू शकणारी मराठी भाषा नवकाव्यात मात्र दुर्बोध होते किंवा नवकाव्यात असुंदर ओंगळ भाषेत भावना व्यक्त होते हे डॉ. कोलते यांना खटकत असावे. म्हणून वा. रा. कांत ( अं. १०५ ) किंवा गोपीनाथ तळवलकर ( अं. १११ ) यांच्या व्याख्यानातील त्या त्या संदर्भातील उल्लेखांची त्यांनी दखल घेतलेली आढळते. याचबरोबर दि. के. बेडेकर यांनी आपल्या व्याख्यानातून ( अं १०२ ) आशावादी आणि वैफल्यवादी नवकाव्यांची परंपरा शोधण्याचा जो प्रयत्न केला आहे, त्याचेही दर्शन थोडक्यात घडवले आहे.

' मराठीचिये नगरी 'मधून मला जो सर्वात महत्त्वाचा भाग वाटला तो म्हणजे वाङ्मयाबद्दल त्यांचा वेळोवेळी व्यक्त झालेला सुजाण, समंजस, थोर, व्यापक दृष्टिकोण ! विदर्भ साहित्य संमेलनाचे पंधरावे अधिवेशन अमरावती जवळील गुरुकुंज-मोझरी या खेडेगावात साजरे झालेले पाहून डॉ. कोलते यांना आनंदाचे भरते आले ! ' मराठी साहित्य हे मूटभर सुशिक्षितांसाठी किंवा उच्चभ्रूंसाठी नाही. मराठी भाषिकांच्या ज्या संख्याबळावर अवलंबून आम्ही सभासंमेलनांतून मराठी भाषेवरील आक्रमणाबद्दल, तिच्या संरक्षणाबद्दल व संयुक्त महाराष्ट्राबद्दल गर्जून भाषणे करतो,

ते संख्याबळ खेड्यापाड्यात पसरलेल्या बहुजनसमाजाचे होय, हा महत्त्वाचा विचार यांनी मांडला (अं. २०४) आहे.

असेच विचार (डॉ. कोलते यांचे स्वतःचे आणि इतरांचे) अन्यत्र विखुरलेले आहेत. सेतु माधवराव पगडी यांचे उद्गार–' मराठवाड्यातील हजारो खेडी जेव्हा शिक्षण घेऊन बोलू लागतील तेव्हाच मराठी साहित्याच्या उत्कर्षाला अनुकूल वातावरण निर्माण होईल.' (अं. १०५), वि. द. घाटे यांची अहमदाबाद येथे महाराष्ट्र समेलनाचे अध्यक्ष म्हणून निवड झाल्यावर ' घाटे परिषदेचे कार्य साधारण जनतेपर्यंत पोचविण्याची विशेष महत्त्वाची कामगिरी सहज करू शकतील' असा विश्वास डॉ. कोलते यांनी व्यक्त केला आहे. (अं. १०६) मराठवाडा साहित्य परिषदेच्या सहाव्या अधिवेशनाचे दिवाकर कृष्ण केळकर यांचे त्यांनी ' सामान्य श्रमजीवी रसिक अभिरुचीची वाढ करण्याच्या आवश्यकतेकडे दुर्लक्ष होऊ दिले नाही ' याबद्दल अभिनंदन केले आहे. (अं. १०९) अनेक वर्षे बंद पडलेल्या दक्षिण महाराष्ट्र साहित्य-संमेलनाचे ज्या वेळी पुनरुज्जीवन झाले, त्या वेळी अध्यक्षीय व्याख्यानात आचार्य अत्रे यांनी ९० टक्के निरक्षर असलेल्या जनतेपर्यंत संमेलनाचे संदेश गेले पाहिजेत ' हा जो विचार मांडला आहे, त्याकडे वाचकांचे लक्ष वेधून घेतले आहे. (अं. १११).

बोली भाषा ह्या असंस्कृत, इंगाडी, भ्रष्ट भाषा म्हणून ठरविण्याचा प्रमाद आपल्या हातून कदापि घडता कामा नये, उलट त्यांचे गुणविशेष मराठीने स्वतःला जोडून घेऊन आपले सौंदर्य आणि सामर्थ्य वृद्धिंगत करून घ्यावे हा नानासाहेब गोरे यांनी ' मांडलेला विचार (अं. ११०), ना. घ. देशपांडे यांचेही विचार (अं. १०७) उद्धृत करून बोलीभाषेसंबंधी आपलीही जिव्हाळयाची भावना व्यक्त केली आहे. ' अंजनी '-चे परीक्षण करताना (अं. ११२) ग्रामीण कादंबरीत व्यक्तिचित्रणाच्या दृष्टीने कादंबरीतील पात्रांच्या तोंडी बोली भाषा वापरणेच अधिक इष्ट आहे. बोली भाषा ह्या परकी भाषा नसून त्या मायमराठीला पुष्टतुष्ट करणाऱ्या प्रेमळ लेकी होत ' हाच अभिप्राय डॉ. कोलते यांनी व्यक्त केला आहे.

आलेल्या मजकुराची निवड करून व ठराविक पृष्ठांच्या मर्यादेत तो समाविष्ट करून त्यास प्रसिद्धी देणे एवढेच संपादकाचे कार्य असत नाही. संस्थेचे ध्येय, धोरण अधिक सुस्पष्ट करणारा, संस्थेची प्रतिष्ठा वाढविणारा, तिचे कार्य सर्वदूर पसरविणारा, कार्याचे एकसुरी स्वरूप न ठेवता त्यात विविधता आणणारा, सामाजिकतेचे भान ठेवणारा, समन्वय साधणारा व्यासंगी, सहृदय असा संपादक असावा लागतो.

डॉ. वि. भि. कोलते यांनी संपादित केलेले अंक पाहिल्यावर या सर्व अपेक्षा पूर्ण होतात, अशी पावती प्रसन्न मनाने देता येते.

८

# मराठीतर विद्यार्थ्यांसाठी मराठीचे अध्यापन

शैलजा महेश्वर करंदीकर

गेली सतरा वर्षे दिल्लीतील मराठीतर विद्यार्थ्यांना मराठी शिकवावे लागले. त्या अनुभवाचे हे सारभूत निष्कर्ष जिज्ञासूंना रोचक वाटतील अशी अपेक्षा आहे. केवळ वैयक्तिक अनुभवावर आधारलेले पुढील विचार मुख्यतः व्यावहारिक भूमिकेवरूनच मांडलेले असल्याने ते कदाचित व्याकरणाच्या व भाषाशास्त्राच्या काटेकोर चौकटीत चपखलपणे बसू शकणार नाहीत, याची प्रस्तुत लेखिकेला पूर्ण जाणीव आहे.

**वर्णमाला**—हिन्दीची देवनागरी आणि मराठीची बालबोधिनी या दोन्ही लिपींची वर्णमाला जवळजवळ सारखीच असल्याने ' अ, आ ' पासून प्रारंभ करून ' प्रथमग्रासे मक्षिकापातः ' असा निराशाजनक अनुभव सुदैवाने घ्यावा लागत नाही. किरकोळ अंतर आहे तेवढ्याचाच परिचय करून दिला की काम भागते. मुख्य अडचण ' ळ' वर्ण आणि ' चवर्गाचे ' दोन प्रकारचे उच्चार ही मराठीच्या बाजूने, तर ' क ' आणि ' ट ' वर्गांचे दोन भिन्न उच्चार ही हिंदीच्या पक्षाने उद्भवते. विशेषतः ' चा ' आणि ' च्या ', ' जा ' आणि ' ज्या ' हे भेद उच्चारसाम्यामुळे हिंदी भाषिकाच्या डोक्यावरून जातात आणि ' चा'कारान्त षष्ठीचे मूळरूप व सामान्यरूप एकाच प्रकारे लिहिले व वाचलेही जाते–' राजाचा वाडा ' आणि ' राजाच्या वाड्यावर ' यांत हटकून घोटाळा होतो. ' ळ 'चे लेखन कसेबसे जमले तरी उच्चार मात्र कधी ' ड़ ', कधी ' ल ' तर कधी ' ड् ' असा संमिश्र रूप धारण करताना ऐकू येतो. ' ज्ञ ' चा उच्चारही हिंदीत निराळा होऊन ' आज्ञा ' ' आग्या ' ( वेताळ ! ) बनून अवतरते. पूर्णविरामाच्या स्थानी दंड देण्याची सवय अनेकवार सांगूनही सुटत नाही आणि इतर विरामचिन्हे वापरायची तर हिंदी विद्यार्थ्यांना सवयच नसते. पण इंग्रजीच्या परिचयामुळे ती सवय ते लवकर आत्मसात करू शकतात. नवीन शुद्धलेखनानुसार दीर्घ बनून राहिलेले अंत्य ' ई ' व ' ऊ ' आणि नष्ट झालेले अनुच्चारित अनुस्वारही चटकन अंगवळणी पडणे कठीणच. मराठीचा निभृत ' अ ' देखील तसा जडच जातो आणि अन्त्य' अ 'चा उच्चार विशेषतः विशेषनामांत ' आ ' असा केला जातो.

अनुक्रमणिका

जसे, ' लक्ष्मणा, ' भरता ' इत्यादी. हिंदी पंडितांची प्रवृत्ती अधिक प्रमाणात संस्कृत-निष्ठ बनू पाहत असल्याने उच्चारित अनुस्वारांच्या स्थानी परसवर्ण अनुनासिक लिहिले जाते. क, ड, ज, इत्यादी अक्षरांखाली पार्शियनप्रमाणे अधोबिंदू देण्याची प्रवृत्तीही बरीच नडते. अनुस्वाराऐवजी चंद्रबिंदू ( ँ ) देण्याकडे कल असतो, तर ' कॉफी 'सारखे शब्द चांदाविनाच ( ॅ ) लिहिले जातात. असे लेखनातले वा उच्चारातले मोजकेच भेद सोडले, तर दोन्ही भाषांची वर्णमाला जवळजवळ मिळतीजुळती आहे. पण हस्ताक्षराच्या वळणात मात्र खूपच अंतर पडलेले असल्याने हिंदी विद्यार्थ्यांने लिहिलेले मराठी वाचणे सवय होईतो फारच जड जाते.

लेखनवाचनाच्या मार्गातले उपर्युक्त अडथळे ओलांडले की, मग शब्दसंहतीतल्या अडचणी जाणवू लागतात. वस्तुतः इथेही भेदांहून साम्यच अधिक आहे, कारण दोनही भाषा संस्कृतोद्भव आहेत व तत्सम व तद्भव मिळून जवळजवळ ऐंशी टक्के शब्द संस्कृतातूनच आलेले आहेत. तरीदेखील पुढील गोष्टी खटकल्याविना राहत नाहीत. एकतर उभय भाषांतली एकाच संस्कृत शब्दाची तद्भव रूपे थोडीफार भिन्न असतात. अर्थात संस्कृतचे पुरेसे ज्ञान असेल तर या भिन्न तद्भवांचे मूळ संस्कृत रूप एकच असल्याचे उमगून अर्थाकलनास प्रत्यवाय येणार नाही. 'आंबा' व ' आम ', ' सुपारी ' व ' सुपारी ' या जोड्या स्वार्थवाचक असल्याचे संस्कृत जाणणाऱ्याला निराळे सांगावे लागत नाही. परंतु उत्तरोत्तर वृद्धिंगत होऊ पाहणारी संस्कृतविषयीची उपेक्षावृत्ती येथेही आडवी येताना आढळते. संस्कृत तद्भवांप्रमाणेच अन्य विदेशी भाषांमधून आलेल्या शब्दांचीही रूपे भिन्न असतात—' प्लॅटफॉर्म 'चा मराठीने ' फलाट ' बनविला आहे, तर हिंदीने ' पटडी '. ' टी 'चा मराठीत ' चहा ' तर हिंदीत चाय. ' जगह 'ची मराठीत ' जागा ' पण हिंदीत ' जगे ' इत्यादी. तद्भव शब्दांत रूपभिन्नतेचा अडथळा येतो, तर कित्येक तत्सम शब्दांतदेखील अर्थभेदा-मुळे घोटाळा होतो. ' अभ्यासा 'चा अर्थ मराठी भाषिक ' अध्ययन ' असा करणार तर हिंदी भाषिक ' सवय '. ' उपन्यास ' मराठीत ' प्रस्तावने 'चा वाचक तर हिंदीत ' कादंबरी ' या साहित्यप्रकाराचा. ' कष्ट ' म्हणजे मराठीत ' काबाडकष्ट ' तर हिंदीत ' त्रास '. त्रासचा अर्थ मराठीत ' ताप ' तर हिंदीत ' भय '. तत्समांसारखेच अर्थभेद तद्भवांतही आहेतच—

| **मराठी** | **हिंदी** | **मराठी** | **हिंदी** |
|---|---|---|---|
| ऊन | लोकर | खोली | खोळ, अभ्रा |
| ऊब | कंटाळा | गेंद | चेंडू |
| खत | पत्र | चरितार्थ | कृतार्थ |
| गुमान | घमेंड | चेष्टा | प्रयत्न |
| | | झेप | लाज |

—अशी किती तरी उदाहरणे देता येतील. 'उपर जगा खाली है।'. या बस कंडक्टरच्या सूचनेमुळे उडालेल्या गोंधळाचे उदाहरण प्रा. वा. म. जोशी यांनी 'इंदु काळे व सरला भोळे' या कादंबरीत दिलेच आहे. सेमेटिक तद्भव व तत्सम यांतही अर्थभिन्नता आहे—'दर्या'—'नदी', 'राजीनामा'—'करारपत्र', 'तक्रार'—'भांडण', 'नादान'—'अडाणी', 'यारी'—'दोस्ती', 'सही'—'योग्य', 'हरकत'—'दुर्व्यवहार.' यांसारखे अर्थविपर्यास नवशिक्याला घोटाळ्यात टाकल्याविना कसे राहणार ? याहूनही अडचण येते ती 'डोळा', 'डोके', यांसारख्या देशज शब्दांची. त्यांची तर मराठीतरांना कुठूनच तोंडओळखदेखील होण्याचा संभव नसतो. मग साम्यापायी 'नेत्र' कोणता आणि 'शिर' कोणते, अशा संभ्रमात पडण्याची पाळी त्यांच्यावर येते.

संयुक्त क्रियापदे आणि वाक्संप्रदाय ध्यानात ठेवणे असेच कठीण पडते. 'दे देना'—देऊन टाकणे, 'ले लेना'—घेऊन टाकणे, यांसारख्यांतली सहायकारी क्रियापदे अडचणीचीच भासणार. नागपूरकडचे मराठी भाषिकदेखील 'देऊन दिले,' 'सांगून दिले' असा हिंदीसमान प्रयोग करताना आढळतात ते यामुळेच. हिंदीत अशा संयुक्त क्रियापदांचा भरणा जरा अधिकच दिसतो—'गिर जाना'—पडणे. 'हंस देना'—हसणे. 'मुड जाना'—वळणे अशा संयुक्त क्रियापदांचे मराठीतले एकेरी प्रतिशब्द मराठीतरांना काहीसे जाचतातच.

हिंदी विद्वानांची कट्टर संस्कृतनिष्ठाही प्राध्यापकांना अडचणीत टाकू शकते. सेमेटिक शब्दांचे उच्चाटन करण्यावरील वाढत्या कटाक्षामुळे 'आणि' या अर्थी 'व'चा, 'प्राणप्रिय मित्र' या अर्थी 'दिलजान दोस्त'चा प्रयोग ते वर्ज्य मानतात. 'हवा' शब्दाच्या स्थानी 'वायू' सुचवितात आणि 'जागी' चे स्थान 'स्थळी' ला देतात. शासनप्रणालीतले कित्येक नवागत शब्दही असेच जाचक ठरतात. आणीबाणीमुळे 'अनुशासन' आता सर्वांना परिचित झालेले आहे. पण 'राजकीय—राजनीतिक,' 'शासकीय'—'राजकीय', 'प्रबंध'—'व्यवस्था', इत्यादी हिंदी पर्याय खटकणारच. दैनंदिन बोलण्यातसुद्धा मराठी 'ही' म्हणजे हिंदी 'भी' व मराठी 'च' म्हणजे हिंदी 'हि' हा घोटाळा चटकन उलगडत नाही. हिंदी 'बरात' वरपक्षाचे आगमन सुचविते, तर मराठी 'वराती'ला हिंदीत 'डोली' म्हणतात.

हिंदी बोलीतली आदब साधणे तर मराठीच्या तथाकथित स्पष्टवक्तेपणाला दुष्कर होऊन बसते. 'हमतुम' करणारा मराठी भाषिक मनुष्य हिंदी माणसाला कदाचित एकदम हमरीतुमरीवर यायला लावील. तो तर लहान मुलांशी वा नोकराशीदेखील एकवचनात बोलत नाही. एखाद्या विद्यार्थ्याने 'मेरे लायक कोई सेवा' असा औपचारिक प्रश्न विचारताच, त्याला काही सेवा सांगितली, तर कदाचित अपसमज होण्याचा प्रसंग यायचा. अर्थात एकंदर पाहता हिंदीचे विद्यार्थी नम्र व सभ्य

अनुक्रमणिका

असल्याचे आढळून आले. त्यांचे सारेच बोलणे औपचारिक होते असे म्हणता येणार नाही. तरीही आदर पाळण्याच्या स्वाभाविक प्रवृत्तीच्या अभावी त्याचा अनाहूतपणे अवमान होणार नाही याची काळजी घेणे इष्ट ठरते.

### वाक्यरचना

शब्दसंहतीनंतर अडते ती वाक्यरचना. तसे पाहिले तर या दोन्ही भाषांत वाक्यरचनेचे काटेकोर असे नियम फारसे नाहीत, भरपूर स्वातंत्र्यच आढळून येते. त्यातही सामान्यतः कर्ता, कर्म, क्रियापद व त्यांच्यामागे त्यांच्या उपाधी असा सरधोपट अनुक्रम उभय भाषिक सामान्यतः पाळतात. तरीही प्रत्येक भाषेची काही स्वतंत्र वैशिष्ट्ये जाणवल्याविना राहत नाहीत. मराठीत विभक्तीचे प्रत्यय व शब्दयोगी अव्यये मूळ शब्दाला जोडून लिहितात, तर हिंदीत त्यापासून तोडून. 'राम का'—रामाचा, 'घर पर'—घरावर, 'बम्बई से'—मुंबईहून. याचा आणखी एक परिणाम असा होतो की, अनेक नामे वा सर्वनामे एकाच संदर्भात योजल्यास हिंदीत प्रत्यक्ष वा शब्दयोगी अव्यय शेवटच्या नामाला जोडतात, पण मराठीत ते सर्वच नामांना जोडावे लागतात. किंवा शेवटी 'या' हे सर्वनाम घालून त्याला जोडले जाते. 'राम, गोविंद और गोपाल ने काम पूरा किया।' या रचनेचा प्रभाव अलीकडे मराठीवरही क्वचित पडलेला दिसतो. पण सामान्यत: 'राम, गोविंद व गोपाळ यांनी काम पूर्ण केले' अशी रचनाच अधिक प्रमाणात रूढ आहे. संधी न झालेले सामासिक शब्द-देखील हिंदीत तोडून लिहितात—'चक्र पाणी', 'पाणि ग्रहण', 'गंगा जल', नर सिंह, 'राम चंद्र' यांसारख्या रचना मग मराठीतही अभावितपणे उतरतात. मराठी लेखकांची नावेही अशी तोडली जातात व 'जगजीवन राम'च्या अनुकरणाने 'शालिग् राम' असे अभिनव नाव सिद्ध होते! 'नाही' व 'नको' ही क्रियापदे मराठीत वाक्यान्ती येतात, पण हिंदीत मुख्य क्रियापदापूर्वी. तिच्या अनुकरणाने 'मैं नहि जाऊंगा'चे 'मी नाही जाणार' व 'यह काम मत करो'चे 'हे काम नको करू' असे भाषांतर केले जाऊन अनाठायी व्यर्थ जोर दिल्याचा भास होतो. हिंदी 'क्या'चा अर्थ 'काय' वा 'का'. 'का' या अर्थी तो वाक्यारंभी येत असतो. अर्थातच 'क्या मैं जा सकता हूं चे भाषांतर 'काय मी जाऊ शकतो?' असे विचित्र रूप घेते. या चुका आवर्जून टाळण्याची समज विद्यार्थ्यांना द्यावी लागते.

### व्याकरण

वाक्यरचनेतील उपर्युक्त घोटाळे अर्थग्रहणात तसे नडत नाहीत. शब्दसंहतीच्या अडचणीही कोश वापरून दूर सारता येतात. खरी अडचण जाणवते ती व्याकरण शिकविताना वा शिकताना. वास्तविक हिंदी व मराठी या दोन्ही संस्कृतोद्भव भाषा.

अर्थात त्यांच्या व्याकरणांचाही स्थूल आराखडा तसा मिळताजुळताच आहे. त्यामुळे तौलनिक दृष्टिकोन समजल्यास अध्ययनअध्यापन जड जाऊ नये. परंतु मुळात हिंदीच्या व्याकरणाचेही व्यवस्थित अध्ययन विद्यार्थिदशेतल्या कोणत्याही पातळीवर होत नसावेसे दिसते. अर्थातच 'सकर्मक भूतकाळ हिंदीसारखाच मराठीतही—काही अपवाद वगळता—कर्मणी होत असतो,' या विधानाचा उमज पडूच शकत नाही. आणि 'राम ने आम खाया' व 'रामाने आंबा खाल्ला' यांतील व्याकरणसादृश्य ध्यानी आणून देणे वा घेणे सुलभ जात नाही. कर्मणीची ही तऱ्हा, मग भावे प्रयोगासारखा वेगळा प्रयोग कसा गळी उतरायचा? 'रामाने रावण मारला' येथपर्यंत ठीक आहे. पण 'रामाने रावणाला मारले' हे कसे काय, हा त्यांना स्वाभाविकच प्रश्न पडतो. कर्ता व कर्म पुल्लिंगी असूनही क्रियारूप पुल्लिंगी का नाही, ही पहिली शंकाच तशी सहजगत्या निराकरणीय नाही. वर हिंदीत नपुंसकलिंगाचाच लोप होऊन गेल्याने, हे तृतीय पुरुषी नपुंसकलिंगी रूप त्यांच्या कसे गळी उतरणार? 'जितं मया'यासारख्या अकर्तृक संस्कृत रचनेचा आधार घ्यावा, तर संस्कृतचेही ज्ञान जवळ जवळ शून्यच. शिवाय तौलनिक दृष्टीने अध्ययन करून स्वेतर भाषेचे यथातथ्य ज्ञान जोडायला जी आस्था लागते, तिचाही सामान्यतः अभावच जाणवतो. 'शिपायाकडून चोर धरला गेला' यासारख्या इंग्रजी धर्तीच्या रचनाही जशा संस्कृतात, तशाच इंग्रजीत या परिस्थितीपायी अडचणीच्याच ठरतात. विध्यर्थ मराठीत कर्मणी, तर हिंदीत कर्तरी, 'रामाने जावे'चे भाषांतर हिंदीत 'राम जाएँ' असे होणार. अर्थात मराठी विध्यर्थ अ—मराठी अभ्यासकाला जडच वाटणार.

नपुंसकलिंगाची घोंड तर पदोपदी अडत राहते. पाऊस, स्वप्न, यांसारखी अपवादात्मक नामे वगळता संस्कृतमधील लिंगे सामान्यतः मराठीने जशीच्या तशीच उचललेली दिसतात. पण हिंदीने इकडे नपुंसकलिंगाचा त्याग केला, तर तिकडे सेमेटिक भाषांचे मुक्त अनुकरण केले. त्यामुळे ती काहीशी स्त्रीलिंगबहुल झाल्याचा भास होतो—'आत्मा', 'सरकार', 'पुलिस', 'मृत्यु', 'वायु', सारेच सर्रास स्त्रीलिंगात वावरताना दिसतात. अर्थात असे शब्द उभय भाषांना साधारण असूनही मराठीत अचूक लिंग योजणे जडच जाते. जिथे हिंदीत लिंगपरिवर्तन नाही पण मराठीने केले आहे, तिथेही तीच अडचण येते—'दशरथ ने स्वप्न देखा'चा अनुवाद 'दशरथाने स्वप्न पाहिला' असेच अभावितपणे व्हायचे. यासाठी मराठीत लिंगनिदर्शक कोशाची अत्यंत आवश्यकता जाणवते.

लिंगासारखीच दुसरी अडचण सामान्यरूपांची. हिंदीतही सामान्यरूप होते; पण ते आकारान्तापुरतेच सामान्यतः आढळते. नामांच्या जोडीला आकारान्त विशेषणे व षष्ठ्यन्ते यांचेही सामान्यरूप हिंदीत होत असतेच. तरीदेखील 'मेरा घोडा', 'मेरे घोडे को' व 'मेरे काले घोडे को' यांसारखेच मराठीतही 'माझा घोडा',

'माझ्या घोड्याला' व 'माझ्या काळ्या घोड्याला' असे प्रयोग होत असतात, हेही मायबोलीचे व्याकरणज्ञान व तौलनिक दृष्टी यांच्या अभावी चटकन ध्यानी येत नाही. तसेच मराठी सामान्यरूप आकारान्तापुरते मर्यादित नाहीच. कधी दोन्ही वचनांत समान (घोड्या), कधी दोहोंत निरनिराळी (माळेला, माळांना), तर कधी केवळ एकाच वचनापुरते (नदीला, नद्यांना) मर्यादित.

या घोटाळ्याच्या भरीला आणखी एकाच जातीच्या शब्दांची भिन्न प्रकारे (शाळेला, शाळांना व भिंतीला, भिंतींना) आणि भिन्न जातींच्या व लिंगांच्या शब्दांची एकाच प्रकारे (देवाला, फुलाला, घोड्याला, जात्याला) हा गोंधळ विद्यार्थ्यांचा उत्साहभंग करणाराच ठरतो. अनेकवचनी रूपांतल्या उपान्त्यांवरील अनुस्वार हिंदीतही असूनदेखील तो अभ्यासकाच्या ध्यानात राहीलच असे नाही. दोन्ही भाषांत सर्वनामांची देखील सामान्यरूपे होतात. त्यांतही हिंदीत उभयवचनी भिन्न सामान्यरूप, पण मराठीत एकच होत असते–'वह–उस, उन,' 'यह–इस, इन,' 'जो–जिस, जिन'च्या मानाने मराठीतले या–कारान्त रूप 'त्या,' 'ह्या' अथवा 'या' आणि 'ज्या' सोपे वाटावे. पण स्त्रीलिंगी एकवचनात तर ते तसे होत नाही. हिंदी सर्वनामांना हा लिंगभेद व तोही तिहेरी, माहीतच नाही. 'आपण' हे सर्वनाम अधिकच घोटाळ्याचे. मराठीत 'मी', 'मी व तू', 'आम्ही' किंवा 'मी, तुम्ही व ते,' तसेच 'तुम्ही' या सर्वच अर्थी ते येत असून प्रत्येक अर्थी क्रियारूपे भिन्न येतात. उलट हिंदीत 'तुम्ही' व 'ते' एवढ्यांपुरतेच ते येते, आणि क्रियारूप तृतीय पुरुषी अनेकवचनीच असते. एकवचनी 'तू'चा प्रयोग तर हिंदीच्या आदबीला मानवणे शक्य नाही.

वरील विस्तृत ऊहापोहाचा अर्थ असा मात्र नव्हे की, हिंदी भाषिकांना मराठी शिकविण्याचा खटाटोप हा वाळूतून तेल गाळण्याइतकाच निष्फळ ठरतो. तसे पाहिले तर आजच्या युगात अध्यापन हा उद्योगच मुळी बव्हंशी निष्फळ ठरू पाहत आहे. पण उपर्युक्त अडचणींचा निर्देश मुख्यतः मार्गदर्शनार्थच केलेला आहे. तसेच ज्या अडचणी प्राधान्याने जाणवतात त्या मराठीत भाषांतर वा स्वतंत्र लेखन करताना. साहित्याचे वाचन व अर्थग्रहण त्या मानाने खूपच सोपे जाते. कोशाचे साहाय्य व लिपींची समानता त्या दृष्टीने उपकारक ठरते. भरीला दोन्ही भाषांतील साहित्याचा व समीक्षेचा विकासही साधारणतः एकाच क्रमाने झालेला असल्याने आवश्यक ती वैचारिक बैठक आधीपासूनच सिद्ध झालेली असते. त्यामुळे परीक्षेचे माध्यम हिंदी भाषाच असेल तर मराठी (विशेषतः आधुनिक मराठी) काव्य, नाटक, कादंबरी, निबंध वा कथा इत्यादींवरील समीक्षात्मक प्रश्नांची सविस्तर उत्तरे लिहिणे, ससंदर्भ स्पष्टीकरण वा टिप्पणी लिहिणे तसे कठीण पडत नाही. अशा प्रकारे स्वतंत्रपणे रचना करणे काहीसे कठीण भासले तरी वाचन, आकलन व रसग्रहण या दृष्टींनी मराठी सुलभ

वाटत असल्याने अन्य भाषांची सामान्यतः उपेक्षाच करणारे हिंदी विद्यार्थी ( तसेच पंजाबीही ) मराठी वा गुजराती शिकायला अल्पसंख्येने का होईना, पण पुढे येतात. कोशाच्या साहाय्याने अर्थग्रहण करण्यास पुरेसे अध्ययन पहिल्या सहामाहीतच होऊ शकते, आणि पुढे क्रमिक पुस्तकांचे स्थूल मानाने विवरण सांगितल्यानंतर सर्वांगीण मूल्यमापन वा रसग्रहण करण्यात मात्र मराठीतर विद्यार्थी मागे पडत नाही. साहित्यिक मूल्यांचे निकष दोन्ही भाषांनी संस्कृत व पाश्चात्त्य काव्यशास्त्रांतून ग्रहण केलेले असल्यामुळे दोहोंच्या समीक्षापद्धतींत भेदापेक्षा साम्यच अधिक आहे. तशी भारतीय साहित्याची मूलभूत प्रकृतीही स्थूल मानाने समानच राहिलेली आहे. आजचे युगदेखील भिन्नभाषिक साहित्यांच्या तौलनिक अध्ययनाच्या द्वारा उपर्युक्त समानतेचा मागोवा घेण्याचेच आहे. अर्थात वाङ्मयीन समीक्षेच्या सुलभतेमुळे एम. ए. वा एम. लिट. यांसारख्या परीक्षांसाठी तुलनात्मक प्रबंधिका किंवा पीएच. डी. साठी प्रबंध सिद्ध करण्याच्या दृष्टीने संशोधन करण्यासाठी पुढे सरसावून बरेचसे विद्यार्थी त्यात स्पृहणीय यशही पटकावतात.

मराठीतरांच्या अध्ययनाचे व म्हणूनच अध्यापनाचे स्वरूप व उद्दिष्ट असे मर्यादित असते. अध्ययनाला अनेकदा प्रेरणा मिळते ती प्रगाढ ज्ञानाच्या आस्थेची नव्हे, तर सवंग उपाधी पदरात पाडून घेण्याच्या विद्यार्थिसुलभ अभिलाषेची. त्यातही हिंदी ही राष्ट्रभाषा आहे. तीत सर्वच भाषांतील उत्कृष्ट साहित्याचे बरेवाईट अनुवाद करण्यासाठी शासनाकडून विपुल साहाय्य मिळत आहे. अर्थात ‘ ज्ञानेश्वरीसारखे अभिजात काव्यतरी मुळातूनच वाचण्याची आवश्यकताच काय आहे ? आम्ही ते अनुवादाच्या द्वारा हिंदीतच आणून वाचू ’, ही भावनाही खऱ्याखुऱ्या भाषिक अध्ययनाच्या आड येत आहे. या मर्यादा ध्यानी घेऊनच अध्यापन करणे उपकारक ठरू शकेल.

मराठीतील नाट्यसाहित्य खूपच प्रगत असल्याचे मान्य करून त्याचे तौलनिक संशोधन करण्यासाठी पुढे येणारा आस्थेवाईक प्रामाणिक विद्यार्थीदेखील नसल्या भाषाभिमानाला बळी पडू शकेल ही वस्तुस्थिती दृष्टीआड करता येत नाही. तौलनिक अभ्यासाच्या द्वारा भावनिक ऐक्य साधण्याच्या आजच्या प्रवृत्तीचा विचार करता, भाषेच्या व्याकरणनिष्ठ काटेकोर अध्ययनावर भर देण्यात फारसा अर्थ दिसत नाही. उलटपक्षी कोशाच्या साहाय्याने मराठी साहित्याचे आकलन, मूल्यमापन व रसग्रहण करण्यापुरते मार्गदर्शन करणे अधिक श्रेयस्कर वाटते. एकतर पदव्युत्तर अध्ययन करणाऱ्या विद्यार्थ्याला प्राथमिक वाचनमालांत रस वाटणे सुतराम शक्य नाही. दुसरे म्हणजे समग्र व्याकरणाचा औपचारिक अभ्यास भाषाशास्त्रज्ञांच्या दृष्टीने अपरिहार्य असला, तरी साहित्याच्या अभ्यासासाठी इतक्या सूक्ष्म अध्ययनाची आवश्यकता नसते. किंबहुना, व्याकरणाचे नियम हे दैनंदिन व्यवहाराप्रमाणेच साहित्यातदेखील पाळण्यापेक्षा मोडलेच अधिक जातात. ‘ प्रयोगशरणाः वैयाकरणाः ’ हा अनादिसिद्ध

नियम ध्यानी घेऊन साहित्याच्या माध्यमातूनच भाषा शिकविणे अधिक उपकारक ठरते. त्यामुळे काटेकोर व्यापारातील नियमांची धोंड दूर होऊन साहित्यविषयक जिज्ञासा तृप्त करून घेण्याचा मार्ग मोकळा होऊ शकतो. त्या दृष्टीने काही सूचना पुढे विचारार्थ दिल्या आहेत.

हिंदीची कारकव्यवस्था अर्थाधिष्ठित असली तरी मराठीच्या प्रथमा व द्वितीया यात सोयीच्या असल्याने विभक्त्यर्थावर भर देऊ नये. त्यांच्या संख्येचीही चर्चा करण्याचे कारण नाही. प्रत्यय सांगितले की पुरे. षष्ठी व्यावहारिक दृष्ट्या आकारान्त विशेषण म्हणूनच शिकवावी. तिचे लिंगवचनानुगामी प्रत्ययबाहुल्य ध्यानी घेऊन प्रत्यक्ष उपयोगात अधिक प्रमाणात येणाऱ्या या–कारान्त सामान्यरूपाकडेच अधिक लक्ष वेधावे. पंचमीचा ' ऊन ' प्रत्यय अनेक शब्दयोगी अव्ययांना लागून ' पासून ', ' आतून ' यांसारखी अव्यये बनतात हे निदर्शनास आणून द्यावे. सारेच प्रत्यय न सांगता प्रत्यक्ष व्यवहारात नेहमी उपयोगात येणारे प्रत्ययच तेवढे सांगावे, आणि विभक्तींचे उपयोगही सर्रास केले जातात तेवढेच शिकवावे. प्रयोग, अर्थ इत्यादींचा परिचयही स्थूल मानानेच करून द्यावा. सोयीसाठी हिंदीची उत्तम, मध्यम व अन्य ही व्यवस्था प्रथम, द्वितीय व तृतीय पुरुषांऐवजी स्वीकारता येईल. हिंदीप्रमाणे मराठीत ' है ' या क्रियापदाचे जोड इंजिन नेहमीच लागत नाही, याकडे लक्ष वेधावे. हिंदी भाषिकांची संस्कृतनिष्ठा ध्यानात घेऊन मराठीत रूढ असलेल्या तत्सम शब्दांचा उपयोग अधिक करावा. क्रियारूपे शिकविताना प्रथम आज्ञार्थाचा द्वितीय पुरुष, नंतर भविष्यकाळ, त्यांचे नकार व प्रश्नार्थ यांपासून प्रारंभ करणे सुलभ जाते. तसेच वर्तमानात ' तान्त ' कृदन्ताना, भूतकाळात ' लान्ता 'ला व विध्यर्थात ' वान्ता 'ला जवळजवळ समान प्रत्यय लागतात, याकडे लक्ष वेधावे. जातो, गेलो, जावो, किंवा करते, केले, करावे या साम्यावर भर द्यावा. भूतकाल व विध्यर्थ यांची तृतीय पुरुषी रूपेच अधिक वेळा भाषेत येतात. इतर संयुक्त काळाची रूपे प्रत्यक्ष साहित्यात आढळतील तसतशी शिकवावी. व्याकरणाची अगदी स्थूल अशी रूपरेषा अशा प्रकारे दिल्यानंतर साहित्यातील प्रत्यक्ष प्रयोगांच्या आधारे त्यांतले बारकावे दाखवून देणे सुलभ होते. या सूचना केवळ विचारार्थ मांडल्या आहेत, वैयक्तिक अनुभवानुसार त्यात फेरफार करावे लागतीलच.

तौलनिक साहित्यसमीक्षा लिहिताना येणाऱ्या अडचणींचा स्थूल निर्देश करणेही येथे अनाठायी होणार नाही. प्रशंसा वा टीका करताना एका टोकाला जाण्याची प्रवृत्ती हा हिंदी समीक्षेचा विशेष म्हणावा लागेल. मला वाटते, अतिशयोक्ती ही हिंदी समीक्षेची प्रकृतीच होऊ पाहत असावी. काटेकोर व ठाम विधाने करण्याऐवजी भाषेचा भोंगळ फुलोरा फुलविण्याकडे विद्यार्थ्यांचा अधिक कल दिसतो. संशोधनात्मक लेखनात कृत्रिम व भोंगळ भाषाविलासाला स्थान नसल्याचे त्यांना वारंवार बजावावे लागते.

काही पारिभाषिक शब्दांचे अर्थ उभय भाषांत भिन्न आहेत याचेही अवधान ठेवायला हवे. ' कथोपकथा ' मराठीत कथारचनेत येतील. पण हिंदीत ' कथोपकथन ' म्हणजे संवाद; ' चरित्र ' म्हणजे जीवनाचा आलेख नव्हे, तर ' व्यक्तिरेखा '. नाटकी हा शब्द मराठीत कृत्रिमतेचा वाचक आहे. पण हिंदीत ' नाटकीय ' म्हणजे नाट्यपूर्ण. काही मराठी शब्दांना समर्पक हिंदी प्रतिशब्द सहजपणे सापडत नाहीत. ' कोटी 'चा अर्थ ' चाटूक्ती 'शी चपखलपणे जुळत नाही. ' नाट्यन्याय ', ' दैवदुर्विलास ', ' उपरोध ' इत्यादी शब्दही हिंदीत अजून सर्रास रूढ झालेले दिसत नाहीत व त्यांना समर्पक प्रतिशब्दही रूढ झालेले नसावे. समीक्षेचा एक ढोबळ साचा बनवून तुलना करण्याची प्रवृत्ती बळावू पाहत आहे. तिच्याविरुद्धही जागरूक राहावयास हवे. नाटकात भरतोक्त अवस्थादिकांचा व ॲरिस्टॉटलच्या स्टेजेसचा शोध लागलाच पाहिजे हा दुराग्रह पुष्कळदा अनवस्थाप्रसंग ओढवून आणतो.

...अशा काही मर्यादा ध्यानात बाळगून मार्गदर्शन केल्यास साहित्याच्या तौलनिक अध्ययन-संशोधनात अ-मराठी विद्यार्थी चांगली प्रगती करू शकतील, यात संदेह नाही. अभ्यासक्रमही त्याच अनुरोधाने आखावयास हवेत. क्रमिक पुस्तकांत निवडक अभिजात ग्रंथांचाच समावेश असावा. अतिप्राचीन व अतिनव यांऐवजी आधुनिक ग्रंथांचे प्रमाण अधिक असावे, कारण ते समजण्यास व रसग्रहणास सुलभ असतात. आजचे साहित्य शैली व कल्पना या दोन्ही दृष्टींनी तिरकस बनत असल्याने नवशिक्यांना ते चटकन समजणे कठीणच. त्याचे व जुन्या भाषेतील प्राचीन साहित्याचे अध्ययन पुढील पातळीवर होऊ शकेल. साहित्याच्या इतिहासातही व्यक्ती व ग्रंथ यांच्या नामावळींपेक्षा स्थूल प्रवाह व प्रवृत्ती यांचा परिचय करून देणे महत्त्वाचे. अध्ययन व परीक्षा यांचे माध्यम विद्यार्थ्यांची मातृभाषा हेच असायला हवे. प्राथमिक अवस्थेत मराठीत अनुवाद वा स्वतंत्र लेखन यांची अपेक्षा ठेवली जाऊ नये. तात्पर्य भाषा व ग्रंथसंपदा शक्य तेवढी सहजसुलभ होऊन साहित्याचे रसग्रहण व मूल्य-मापन त्वरेने करता येईल हेच प्रमुख लक्ष्य असायला हवे.

सर्वांत महत्त्वाचा प्रश्न येतो. तो अ-मराठी भाषिकांना मराठीचे अध्ययन लाभदायी (worthwhile) होऊ शकते का, हा होय. आजतरी त्याचा निर्णय ' नाही ' असाच द्यावा लागतो. सर्वच पेपर्स हिंदीचे घेणाऱ्या विद्यार्थ्यांना नोकरीच्या बाबतीत सामान्यतः अग्रक्रम देण्यात येतो. त्यामुळे समन्वित अभ्यासक्रम स्वीकारणाऱ्या विद्यार्थ्यांना काही वेळा रखडत राहावे लागते. हा सवतासुभा थांबविण्याचा प्रमुख मार्ग म्हणजे निदान केंद्रीय विद्यापीठातून तरी तौलनिक भारतीय साहित्याचे अभ्यासक्रम चालू करायला हवेत. त्यांसाठी उपयुक्त असे संदर्भ ग्रंथ निर्माण करण्यासही ( हिंदी ) लेखकांना प्रवृत्त करायला हवे. त्यामुळे अशा विद्यार्थ्यांना नवे क्षेत्र खुले होईल आणि पुढे उच्च-तर अध्ययन करण्यास उत्तेजनही मिळेल. आज असे अभ्यासक्रम वा तौलनिक

अनुक्रमणिका

साहित्याचे स्वतंत्र विभाग अगदी एखाददुसऱ्याच विद्यापीठात उपलब्ध आहेत. दिल्लीच्या आधुनिक भारतीय भाषाविभागाने असा अभ्यासक्रम चालू केला आहे; परंतु इंग्रजी माध्यमाच्या दुराग्रहापायी त्याला फारसा प्रतिसाद वा चालना मिळालेली नाही. भारतीय भाषांचे तौलनिक अध्ययन, अध्यापन, संशोधन व मूल्यमापन हिंदीतून व्हावयास प्रत्यवाय नसावा. तरच अशा अभ्यासक्रमांचे सार्थक होईल.

## साभार स्वीकार

पवार आ. ग. (संपा.) : राजर्षि शाहू छत्रपती पेपर्स, शाहू रिसर्च इन्स्टिट्यूट, कोल्हापूर, रु. ५०

देसाई स. शं. (संपा.) शिवशाही पोर्तुगीज कागदपत्रे; शिवाजी विद्यापीठ प्रकाशन, कोल्हापूर रु. ५

पवार अप्पासाहेब (संपा.) : जिजाबाईकालीन कागदपत्रे; शिवाजी विद्यापीठ प्रकाशन, कोल्हापूर.

वाळिंबे वि. स. : रायबरेली व त्यानंतर, श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०, रु. २०.

समर्थ रामदास : दासबोध : अ. ल. गाडगीळ, सदाशिव पेठ, पुणे ३०, रु. ५

कुलकर्णी द. भि. : नाट्यवेध, नूतन प्रकाशन, पुणे ३०, रु. १०.

पाटील भास्कर : अलिप्त, योगेश प्रकाशन, फुलंब्री औरंगाबाद, रु. ६.

बोल्ली लक्ष्मीनारायण : मैफल, सौ. वैजयंती चव्हाण, सोलापूर, रु. ५

बाबुलनाथ : गीतवर्षा, सौ. सरोजिनी काळे, सोमवार पेठ, पुणे ११, रु. ५.

नारायणतनया : रामतीर्थलहरी, सौ. सुशीला जोगळेकर, पुणे ३०, रु. ५.

केळकर चिं. रा. (संग्राहक) : मधुमक्षिका, प्रेरणा प्रकाशन, आसगाव, गोवा रु. ३.

म्हसकर वीणा : श्रीमद्भागवत सारामृत; सौ. ज्योत्स्ना म्हसकर, पुणे; रु. २५

अनुक्रमणिका

# ९

# एक भावसुंदर ‘ कैवल्यलेणे ’

## कृष्णाजी ज्ञानेश्वर भिंगारकर

---

ज्ञानेशांच्याभोवती आजही गूढतेचे वलय आहे. त्यांच्या चरित्राबद्दल, वाङ्मयाबद्दल व तत्त्वज्ञानाबद्दल अनेकविध वाद आहेत. या गूढतेला छेद देण्याचा प्रयत्न प्रा. कृष्णा गुरव यांनी ‘ कैवल्यलेणे ’ या आपल्या पुस्तकात केला आहे. या संग्रहात एकूण पाच निबंध आहेत. या भावदीप्त पंचारतीने त्यांनी प्रभूला ओवाळले आहे. दोन निबंध पूर्णपणे संशोधनात्मक आहेत व तीन रसास्वादात्मक आहेत.

पहिला निबंध ज्ञानदेवांच्या ‘ अजानवृक्षा ’वर आहे. अजानवृक्षासंबंधीची माहिती लेखकाने परिश्रमपूर्वक गोळा केली आहे. अध्यात्माच्या व योगशास्त्राच्या दृष्टीने अजानवृक्षाचे महत्त्व अनन्यसाधारण आहे म्हणूनच अजानवृक्षाला ‘ कैवल्यलेणे ’ म्हणणे अतिशयोक्तीचे ठरू नये. अजानवृक्षाची व्युत्पत्ती लेखकाने नवीन पद्धतीने मांडली आहे. ‘ ज्या झाडाखाली बसून साधना केल्यावर अज्ञान दूर होते, असा वृक्ष म्हणजे अजानवृक्ष ’ अशी अर्थव्याप्ती लेखकास अभिप्रेत नाही. ‘ अज्ञान ’ म्हणजे ‘ ज्ञानाचा अभाव ’, म्हणजेच ‘ ज्ञानातीत अवस्था ’. नाथसंप्रदायाच्या तत्त्वज्ञानानुसार ब्रम्ह हे द्वैताद्वैतविलक्षण व ज्ञानाज्ञानातीत आहे. त्या अवस्थेत साधकाचे अज्ञान तर नष्ट होतेच, पण ज्ञानही नष्ट होते; साधकाला ज्ञानातीत अवस्था प्राप्त होते. ज्ञानेशांचा हा आवडता सिद्धान्त आहे. लेखकाने दिलेल्या व्युत्पत्तीत दूरान्वय असला तरी ती व्युत्पत्ती नाथसंप्रदायातील तत्त्वज्ञानाला पोषक अशीच आहे. अजानवृक्षाच्या यौगिक व आध्यात्मिक शक्तींबद्दल अधिक संशोधन व्हायला पाहिजे.

‘ त्र्यंबकपंतांची समाधी ’ हाही शोधनिबंधच आहे. त्र्यंबकपंत हे ज्ञानेश्वरांचे पणजोबा. त्यांची समाधी आपेगावला आहे असे लेखकाने म्हटले आहे. त्र्यंबकपंत मूळचे आपेगावचे. ते भक्त होते. त्यांची समाधी आपेगावाला असणे स्वाभाविक आहे. ती स्वप्नदृष्टान्तामुळे सापडली. लेखकाने स्वप्नदृष्टांताचा जो पुरावा दिलेला आहे, तो संशोधनक्षेत्रात ग्राह्य मानता येत नाही. डॉ. रा. चिं. ढेरे यांनी या पुस्तकाच्या प्रस्तावनेत म्हटल्याप्रमाणे श्रद्धेच्या प्रांतात स्वप्नदृष्टान्ताला केवढेही मोठे स्थान असले

अनुक्रमणिका

तरी संशोधनाच्या क्षेत्रात त्याला महत्त्व नाही.

' श्रीज्ञानेशांचा जन्मकाल आणि जन्मग्राम ' या निबंधातील विषयही विवाद्य आहे. त्या संबंधात अभ्यासकांत मतभेद आहेत. लेखकाने श्रीज्ञानेशांचा जन्मकाल निश्चित केला आहे, तो तर्काला पूर्णपणे पटणारा आहे. पण ज्ञानेशांचे जन्मग्राम आपेगावच हा लेखकाचा आग्रह समर्थनीय वाटत नाही. लेखकाने आळंदीमताचा पूर्वपक्ष केला आहे व आपेगावमताचा उत्तरपक्ष केला आहे. आपेगाव हे ज्ञानेशांचे जन्मग्राम आहे हे सिद्ध करताना अभंगांचे अर्थ लेखकाने आपल्याला अनुकूल असे लावले आहेत. आपेगाव हे जर ज्ञानेशांचे जन्मग्राम मानले तर चरित्रातील विसंगती दूर करता येत नाही. काही शंका मनात उभ्या राहतात. संन्यासानंतर पुन्हा गृहस्थाश्रम स्वीकारल्यावर विठ्ठलपंत आपेगावी केव्हा गेले ? ज्ञानेशादी चार भावंडांचे बालपण आपेगावीच गेले का ? मग आळंदीच्या ब्राम्हणांनी ' संन्याशाची मुले ' म्हणून या भावंडांचा छळ केला ही दंतकथाच ठरते. आपेगाव जन्मग्राम असेल तर ही भावंडे आपेगावहून आळंदीला केव्हा व का आली ? त्यांनी मौंजीबंधनाची परवानगी आळंदीच्या ब्राम्हणांजवळ का मागितली ? पैठण आपेगावापासून जवळ आहे. तिकडे आधी जाणे योग्य होते. एकूणच हा विषय विवाद्य आहे. ज्ञानेशांच्या जन्मग्रामाबद्दल व चरित्राबद्दल अधिक संशोधन व्हायला पाहिजे.

' श्रीनिवृत्तिनाथ : एक ज्ञानांजन ' या निबंधात निवृत्तिनाथांच्या अभंगाच्या आधारे त्यांचे अध्यात्मचिंतन सुंदर रीतीने विशद केले आहे. निवृत्तिनाथ हे विश्वमाउली ज्ञानेशांचे सद्‌गुरू व सर्वार्थाने प्रेरणास्रोत असूनही आजपर्यंत ते प्रसिद्धीच्या प्रकाशझोतापासून दूर राहिले याची मनाला खंत वाटत होती. पण हा निबंध वाचल्यावर ती खंत दूर झाली.

' तुजविण एकली रे कृष्णा ' हा शेवटचा लेख बहारीचा झाला आहे. यात लेखकाच्या कविमनाचा पूर्ण आविष्कार दिसून येतो. लेख वाचताना वाचक प्रेमरसात न्हाऊन निघतो. राधा-कृष्णांच्या प्रेमाने आजपर्यंत अनेकांना मोहित केले आहे. प्रा. कृष्णा गुरवांच्या कविमनाला त्याचे आकर्षण वाटले नाही तरच नवल. ज्ञानेशांसारखा प्रतिभावंत महाकवी जेव्हा विरहिणींच्या व गौळणींच्या द्वारे भावमधुर प्रेमाचे चित्र रंगवतो, तेव्हा ते भावरंग-चित्र पाहणे म्हणजे एक दिव्य सोहळाच बनतो.

राष्ट्रीय पंडित कै. बाळाचार्य खुपेरकरशास्त्री यांचा आशीर्वाद व ख्यातनाम संशोधक डॉ. रा. चिं. ढेरे यांची प्रस्तावना या दोन्हींमुळे कैवल्यलेण्याचे सौंदर्य अधिकच खुलले आहे. श्री. शेखर बाली यांचे मुखपृष्ठही अत्यंत लोभस व अर्थपूर्ण आहे.

**' कैवल्यलेणे '** लेखक : प्रा. कृष्णा गुरव
पश्यंती प्रकाशन, ९४ साळुंखे नगर, कोल्हापूर.
प्रथमावृत्ती, डिसेंबर १९७७, पृष्ठे क्राऊन १२०, मूल्य बारा रुपये फक्त.

# १०

## भावगंधाने बहरलेला ‘ मनाचा मोहोर ’

सूर्यकांत रा. खांडेकर

शाहिरी वाङ्मयाचे प्रसिद्ध संशोधक श्री. यशवंत नरसिंह केळकर यांचा ‘ मनाचा मोहोर ’ हा स्फुट कवितांचा संग्रह गतवर्षी प्रसिद्ध झाला असून, या संग्रहात त्यांच्या तेहतीस मराठी व काही इंग्रजी कविता समाविष्ट केलेल्या आहेत. श्री. केळकरांचे यापूर्वीचे संग्रह ‘ गीत द्विदल ’ व ‘ गीतगुंफा ’ हे अनुक्रमे १९२४ व १९३२ या सालांत प्रसिद्ध झाले आहेत. यानंतरच्या सुमारे सेहेचाळीस वर्षांच्या प्रदीर्घ कालखंडात लिहिलेल्या वेचक कविता ‘ मनाचा मोहोर ’ या काव्यसंग्रहात आल्या आहेत. श्री. केळकरांचा मूळ पिंड इतिहास–संशोधकाचा आहे. साहित्यसम्राट कै. तात्यासाहेब केळकर या थोर पित्याचा वारसा लाभल्याने केळकरांनी सुरुवातीच्या काळात ललितलेखन करणे साहजिक होते. ते आजच्या काळापर्यंतही त्यांनी जपले आहे व त्याचेच दृश्य फळ म्हणजे प्रस्तुतचा काव्यसंग्रह होय. त्यांचे सुपुत्र श्री. वि. य. केळकर व स्नुषा सौ. मृणालिनी केळकर यांच्या प्रयत्नामुळे हा छोटासा काव्यसंग्रह साध्याच पण सुंदर रूपात अवतरला आहे. सौ. केळकर यांनी रेखाटलेले मुखपृष्ठावरील मोहोराच्या फांदीचे चित्र सुरेख आहे.

प्रस्तुत संग्रहात निसर्ग-वैभवाचे व कौटुंबिक प्रेमभावनेचे दर्शन तर घडतेच, पण कवीच्या कल्पनारम्य आणि चिंतनशील प्रतिभेचा विलासही पाहावयास मिळतो.

निसर्गाच्या संगतीत कवीचे मन मोहरते, फुलासारखे बहरून येते आणि रसिकतेने नितळ निळ्या आकाशाचे, बांधावरच्या बकुळीचे, वळवाच्या वृष्टीचे, तसेच पावसाळी रात्रीचे ते मूर्तिमंत वर्णन करू लागते. सुंदर कल्पनांनी हे वर्णन सजीव होते—

> आंधळा पावसाळि दुर्दिन, तयाची दुभंग सांगातिण
> जाहली अधिकच दुर्दर्शन, रात्र अंधारी
> बांधुनी त्यात लोचना–झालि गांधारी!

कवीच्या प्रेमभावनेतील जिव्हाळा व आर्तता लक्षणीय आहे. प्रिय व्यक्तीची ‘ प्रतीक्षा ’ करण्यात रमताना व्याकुळ होणारे आणि मनाचा छळ करणाऱ्या दुष्ट

लपंडावाचा अंत करून ' येउनिया भेट, देउनिया खेव ' असे म्हणणारे हे कविमन भावोत्कट आहे. कालांतराने भेटणाऱ्या प्रियेच्या आगमनाने हे मन आनंदून जाते. तिच्या सौंदर्याचे वर्णन करताना त्याचे देहभान हरपते.

ग्रीष्म निमाला, वर्षा सरली पातलीस तू हेमंती
तरि अद्यापी तुझ्या तनूवर ती वासंतिक श्रीमंती !

तिच्या पुनश्च भेटीने हरवलेला सूर पुन्हा गवसल्यामुळे त्याला धन्य धन्य वाटते.

प्रिय कन्येच्या चिरवियोगाने पोळलेल्या पितृहृदयाचे विलक्षण आर्त सूर या संग्रहात ऐकावयास मिळतात. कारुण्याचा हा उत्कट भाव हे या संग्रहाचे खास वैशिष्ट्य मानावे लागेल. ' बापाचे अश्रू ', तिच्या आठवणी ' यासारख्या या संग्रहातील कविता आर्तमधुर आहेत. दुष्ट दैवगतीने एकाएकी अंतर्धान पावलेल्या या प्राणप्रिय कन्येच्या वियोगदुःखाचे गीत ऐकताना मनाची कालवाकालव होऊन जाते. साध्याच शब्दांतून व्यक्त होणारे हे रितेपण प्रत्ययकारक वाटते—

नाद जसा जातो । घंटेला सोडून
तेवी हातातून । गेलीस तू

शाहिरी वाङ्मयाचा व्यासंग आणि सतत अभ्यास करणाऱ्या केळकरांनी एखादा पोवाडा लिहावा हे उचितच होय. त्यांनी लावणी वृत्तात लिहिलेला ' पवाडा केळकरांचा ' राम जोशी, प्रभाकर यांच्या शैलीची आठवण करून देतो. इतर कवितांत ' काळाचा घरट ', ' यदृच्छेने जीव जुळे ' ' माझे माझे ' इ. कविता कवीच्या चिंतनशीलतेचे साक्ष देणाऱ्या आहेत. ' रमेना मन आता कोठे ' व ' माझा महाराष्ट्र ' या गेय रचना लक्ष वेधून घेतात. शुभ्रवसना ' परिचारिके 'चे वर्णनही आकर्षक आहे. ' चंद्राचा मृत्यू ' या कवितेतील चंद्रावर केलेल्या अनेक नावीन्यपूर्ण उत्प्रेक्षा कवीच्या कल्पकतेचा प्रत्यय देणाऱ्या आहेत. क्वचित काही ठिकाणी केलेला जुन्या अपरिचित शब्दांचा वापर खटकतो. मेघमहिष, यलून, इस्पितळ, आकाशाची स्लेट, उसाच्या वाढ्यापरि वाढदीस, कागशीट, हतरुमाल, काचोळी पट्टा असे शब्द व कल्पना मधून मधून रसभंग करतात.

श्री. य. न. केळकरांनी आजवर अनेक जुनी दप्तरे व कागदपत्रे शोधून इतिहासाचे व शाहिरी वाङ्मयाचे संशोधन अत्यंत निष्ठेने व अव्याहतपणे पार पाडले आहे. संशोधनाचे हे कष्टाचे व जिकिरीचे काम करीत असताना त्यांना काव्याचा विसर पडला नाही हे विशेष होय. रविकिरण मंडळाच्या काळापासून केळकरांनी जोपासलेली आपली कविता त्यांच्यातल्या संशोधकाप्रमाणेच नित्य नव्याचा उत्साहाने शोध घेत आहे, हे खचितच स्फूर्तिदायक आहे.

**मनाचा मोहोर** ( कवितासंग्रह ) कवी : यशवंत नरसिंह केळकर.
**प्रकाशक :** वि. य. केळकर आणि सौ. मृणालिनी केळकर,
' पुष्करिणी ', प्रभात मार्ग, पुणे–४, प्रथमावृत्ती, १९७८, पृष्ठे ५८, मूल्य दहा रुपये.

अनुक्रमणिका

# ११

## नवी मौलिक ग्रंथसंपदा

### हेमंत विष्णु इनामदार

---

साहित्यसमीक्षा, चरित्रचित्रण, समाजचिंतन, संस्कृतिसंवर्धन इत्यादी विषयांवर महाराष्ट्र सारस्वतात मोलाची भर घालणारे अनेक उत्कृष्ट ग्रंथ अलीकडे प्रकाशित झाले आहेत. खरे म्हणजे त्यापैकी प्रत्येक ग्रंथाचा स्वतंत्र आणि सविस्तर परामर्श घेणे अगत्याचे आहे. अनेक अडचणींमुळे ते शक्य नसल्यामुळे काही निवडक ग्रंथांचा केवळ धावता परिचय येथे करून दिला आहे.

### १. डॉ. पटवर्धन ऊर्फ माधव जूलियन

ख्यातनाम चरित्रकार डॉ. द. न. गोखले यांनी लिहिलेला हा ग्रंथराज मुंबईच्या मौज प्रकाशन गृहाने मे १९७८ मध्ये प्रकाशित केला आहे. डेमी आकाराची साडे-चारशे पाने असलेल्या या ग्रंथाचे मूल्य चाळीस रुपये आहे. स्वच्छ आणि सुबक मुद्रण, मोहोरदार कागद, मजबूत बांधणी, माधव जूलियनांची दुर्मिळ छायाचित्रे व त्यांच्या हस्ताक्षराचे वेचक नमुने असे ग्रंथाचे बाह्यरूपदर्शनही प्रसन्न–रमणीय आहे.

शेकडो पत्रे, कात्रणांचे अनेक संच, लीलाताई पटवर्धनांची दैनंदिनी, घरगुती कागदपत्र, आठवणी, मुलाखती, संस्थांची दप्तरे इत्यादी विविध स्वरूपाच्या व भरघोस साधनसामग्रीचा धांडोळा घेता घेता, माधवरावांच्या चरित्रचिंतनाने लेखकाला झपाटून टाकले. आठ वर्षांच्या प्रचंड परिश्रमांचा परिपाक म्हणजे हा ग्रंथ होय.

ग्रंथसिद्धीविषयीचे लेखकाचे आत्मनिवेदन असे : " सत्याच्या शोधासाठी मन ताठर होऊ न देता मी ते लवचिक नि स्वागतशील ठेवले होते. चरित्राला जर साहित्याच्या पदवीला पोचायचे असेल तर त्याने सत्य केवळ बुद्धीला पटवून चालणार नाही; भावनांकरवी मनाला ते भोगवले पाहिजे. ही कामगिरी थंड नि तटस्थ चरित्रकार कधीही करू शकणार नाही. तेव्हा, त्या त्या घटनाप्रसंगांत, व्यक्तींत नि व्यक्तिविशेषांत मी मनाने गुंतलो आहे; आणि वाचकांनाही तसे गुंतवण्याचा प्रयत्न केला आहे. "

—लेखकाचा हा प्रयत्न कसा नि कितपत यशस्वी झाला आहे, हे वाचकांनी

अनुक्रमणिका

आवर्जून पडताळून पाहावे. ' साधु, साधु ' अशी पावती प्रसन्न मनाने मिळावी, अशा तोलामोलाचा ग्रंथ डॉ. गोखले यांनी सादर केला आहे.

## २. विधवा विवाह–चळवळ

एक सूक्ष्मदर्शी आणि चिकित्सक संशोधक म्हणून मान्यता पावलेले डॉ. स. गं. मालशे यांनी श्रीमती नंदा आपटे या आपल्या संशोधन छात्राच्या साहाय्याने लिहिलेला हा ग्रंथ श्री. ना. दा. ठाकरसी महिला विद्यापीठाने सप्टेंबर १९७८ मध्ये प्रकाशित केला आहे. डेमी २०२ पृष्ठांच्या या ग्रंथाचे मूल्य बारा रुपये ठेवलेले आहे. पुण्यातील ' श्रीमुद्रण मंदिरा'ने सुरेख छपाई केली आहे.

ग्रंथाची भलावण करताना विद्यापीठाच्या कुलगुरू डॉ. माधुरीबेन शाह लिहितात, " विधवेच्या जिण्याचा खडतरपणा आजही म्हणावा तसा कमी झालेला नाही. तसेच विधवा-विवाहावरील हीनत्वाचा शिक्का अजूनही पुसला गेलेला नाही. सामाजिक प्रमाण कल्पनांना आव्हान देण्याच्या बाबतीत कायद्याच्या कुंपणाव्यतिरिक्त मानसिक अडथळेही आडवे येत असतात. या पार्श्वभूमीवर तर प्रस्तुत ग्रंथाचे विशेष स्वागत करावेसे वाटते. "

एकोणिसाव्या शतकातील समाजसुधारणेत केंद्रवर्ती असणाऱ्या विधवाविवाहाच्या समस्येचा अधिकृत पार्श्वभूमीसह उलगडा करावा या हेतूने हा प्रबंध सिद्ध करण्यात आला आहे. लेखकांचा हा हेतू सर्वतोपरी सिद्ध झाला आहे. ' आपल्या घरामागे विहीर असते, ती आमच्या विधवांना जीव देण्यासाठी ! ' या राम गणेशांनी सांगितलेल्या आर्त कहाणीने सुरू झालेला हा ग्रंथ ' मन पालटल्यावरच मनू पालटत असतो ! ' या चाटूक्तीने पूर्ण होतो.

प्रश्नपत्र, टिपणे, पुनर्विवाहाचा कायदा, महाराष्ट्रीय व गुजराती समाजांतील विधवाविवाहांची यादी, पुनर्विवाहविषयक साहित्य इत्यादी निवडक परिशिष्टे आणि दोन महत्त्वाच्या सूची ही ग्रंथाची उपयुक्त उपांगे आहेत.

## ३. गुलमोहोर

प्रसिद्ध पत्रकार श्री. शंकर सारडा यांचा हा लेखसंग्रह पुण्यातील साधना प्रकाशनाने गतवर्षी प्रकाशित केला आहे. पृष्ठे डेमी १८२; मूल्य वीस रुपये. गुलमोहोराचे समर्पक व सुंदर मुखपृष्ठ श्री. देवीदास बागूल यांचे.

खलील जिब्रान, आल्बेर कामू, आर्थर कोएस्लर, आर्थर मिलर, युजीन ' ओ '-नील, ज्यां–पॉल सार्त्र, सॅम्युएल बेकेट, डी. एच्. लॉरेन्स, बुइल्यम फॉकनेर प्रभृती त्रिखंडकीर्तांचे साहित्यिक, तसेच, दि ब्रिज ओव्हर दि ड्रायना (–इवो आंद्रिच), प्रोफाइल्स इन् करेज (जॉन केनेडी), दि सॉंग ऑफ यूथ (यांग मो) रेडसन

( तु चीआंग ), दि डेथ ऑफ आमुरस ( पार लागेर क्विस्ट ) इत्यादी गाजलेल्या कलाकृती यांचे रसोद्ग्राही आणि मर्मस्पर्शी परिचय करून देणारे 'पस्तीस' लेख या ग्रंथात आहेत. विश्वसाहित्यातील हा फेरफटका लक्षणीय आहे, सुखद आहे.

## ४. चिंतनसुधा

'ॲड्व्होकेट विश्वनाथ त्र्यंबक ऊर्फ दादासाहेब शेटे' हे नाव संत–वाङ्मयाभ्यासकांना दीर्घ-ज्ञात आहे. वैदिक संस्कृती, संत-संस्कृती, इतिहास, साहित्य व समाज यांविषयीचे दादासाहेबांचे चिंतन प्रस्तुत संग्रहात व्यक्त झाले आहे. पुण्यातील 'दास्ताने रामचंद्र आणि कंपनी'ने सप्टेंबर १९७८ मध्ये प्रस्तुत ग्रंथ प्रकाशित केला आहे. डेमी अडीचशे पानांच्या या ग्रंथाचे मूल्य अठ्ठावीस रुपये आहे.

दादासाहेब शेटे पुण्यातील सामाजिक, सांस्कृतिक व साहित्यिक जगाशी समरस झाले आहेत. महाराष्ट्र साहित्य परिषद, भारत इतिहास संशोधक मंडळ व पुणे नगर वाचन मंदिर या संस्थांतील त्यांचे कार्य संस्मरणीय आहे. ( १ ) पुरातनाचा वेध ( प्रलयकथा, यज्ञसंस्कृती व गीतेचे पाश्चात्य टीकाकार ), ( २ ) ज्ञानदेव-परंपरा ( ज्ञानदेव चरित्रातील समस्या, ज्ञानदेवीची निर्मितिप्रक्रिया, पैठणच्या महिषाचे मुक्तिस्थान, तुकोबांची मोक्षयात्रा, इत्यादी ), ( ३ ) मराठ्यांची राजनीती ( पन्हाळ्याचा वेढा, शिवाजीची भेदनीती व मराठ्यांची न्यायपद्धती ) आणि ( ४ ) वाङ्मय व समाज ( मराठी वाङ्मयातील उणिवा, महाराष्ट्रीयांचे वाङ्मयीन स्वभाव–सौंदर्य, महाराष्ट्रीय विचारवंतापुढील समस्या इत्यादी ) अशा चार विभागांतून एकूण बावीस चिंतन-लेख येथे आले आहेत. 'चिंतनसुधेचे अंतरंग हे विधिज्ञ दादासाहेबांची तर्कमुद्रा आणि वाङ्मयोपासक दादासाहेबांची रसिकमुद्रा यांच्या स्वयंवराने रंगलेले आहे.', ही डॉ. रा. चिं. ढेरे यांची भलावण समर्पक आहे.

## ५. स्वातंत्र्योत्तर राजकीय समस्या

पुण्यातील अनसूया मुद्रणालयाचे श्री. पांडुरंग रघुनाथ अंबिके यांनी श्री. विश्वनाथ त्र्यंबक शेटे यांचा प्रस्तुत ग्रंथ ऑगस्ट १९७८ मध्ये प्रकाशित केला आहे. पृष्ठे डेमी १८४ व मूल्य रुपये वीस फक्त. स्वातंत्र्योत्तर भारतीय राजकारणाची मीमांसा हे या ग्रंथातील चोवीस लेखांमागील समान विचारसूत्र आहे. भारताचा उत्कर्ष व्हावा, भारतीय स्वातंत्र्य टिकावे, भारताच्या शत्रूंचा पाडाव व्हावा, जगातील शत्रु–मित्र राष्ट्रांच्या डावपेचांची उकल करावी, अशा भूमिकेतून हे लेख सिद्ध झाले आहेत. एका समाजमनस्क विचारवंताचे हे राजकीय विचारमंथन अल्पाक्षर, आशयबहुल आणि उद्बोधक आहे.

## ६. श्रीज्ञानदेवांचा मृत्यू

औरंगाबादच्या भुवनेश्वरी प्रकाशन संस्थेने श्री. मु. रा. कुलकर्णी यांचा डेमी पंचावन्न पानी हा शोध-निबंध एप्रिल १९७८ मध्ये पाच रुपयांना उपलब्ध करून दिला आहे. ' १८८ समर्थनगर, औरंगाबाद-४१३००१ ' असा संस्थेचा पत्ता आहे.

संतांच्या मृत्यूला ' समाधी ' असे संबोधण्याचा प्रघात आहे. निवृत्तिनाथ, सोपानदेव व मुक्ताबाई यांनी काही जिवंत समाधी घेतलेली नाही. तरीसुद्धा त्यांच्या मृत्यूला नामदेव ' समाधी ' हीच संज्ञा लावतात. नामदेवांची एक खास परिभाषा आहे. त्या परिभाषेत संगती आहे. ती विशिष्ट परिभाषा किंवा शैली ध्यानात घेतली, म्हणजे श्रीज्ञानदेवांना देखील नैसर्गिक रीतीने मृत्यू आला, असेच सिद्ध होते.

संशोधनात अखेरचे सत्य असे काही असत नाही. इतिहास भूतकालीन व्यक्ती आणि घटना यांच्याविषयीचे आपले निर्णय देत असतो; पण हे निर्णय अंतिम स्वरूपाचे नसतात. पुढील पिढीतल्या इतिहासकारापुढे फेरनिर्णयाचे ' अर्ज ' अभ्यासकाला दाखल करता येतात. त्या दृष्टीने सांप्रदायिक पूर्वग्रहाशिवाय आपल्या अभ्यासाचे मूल्यमापन व्हावे, असे लेखकाचे सांगणे आहे हठयोगप्रदीपिका, ज्ञानदेव-गाथा, नामदेव-गाथा, गोरक्ष-संहिता, पातंजल-योगदर्शन इत्यादी ग्रंथांच्या आधारे लेखकाने आपला निबंध मांडला आहे. जाणकारांनी त्याची भूमिका समजावून घेणे अगत्याचे आहे.

## ' श्रीविद्या प्रकाशन ' संस्थेचा वाङ्मयवेध

श्री. दामोदर दिनकर ऊर्फ मधुकाका कुलकर्णी यांची ' श्रीविद्या प्रकाशन ( २५०, शनिवार पेठ, अष्टभुजा रस्ता, पुणे-३० ) ही संस्था पुण्यातल्या प्रकाशन-क्षेत्रातील एक अग्रगण्य संस्था म्हणून मानली जाते. शिक्षणशास्त्रातील सर्व अभ्यास-क्रमांसाठी नानाविध विषयांवर व्यासंगी व अनुभवी अध्यापकांनी लिहिलेली लहान-मोठी अनेक पुस्तके या संस्थेने आजवर प्रसिद्ध केली. त्यामुळे अभ्यासकांची चांगली सोय झाली आणि संस्था आर्थिक दृष्ट्या सुप्रतिष्ठित झाली. मात्र या स्थैर्यामुळे संस्थेला स्थाणुत्व आले नाही. तिने विकासाच्या नव्या वाटा चोखाळल्या.

एप्रिल १९७७ ते जानेवारी १९७९ या केवळ पावणेदोन वर्षांच्या अल्पावधीत श्रीविद्याप्रकाशनाने ललित वाङ्मय, साहित्यसमीक्षा, साहित्यसंशोधन आणि राजकीय वाङ्मय या चतुर्विध अभ्यासक्षेत्रांतील मातब्बर मंडळींचे पंधरा दर्जेदार ग्रंथ (क्र. ७ ते क्र. २१ ) प्रकाशित केले आहेत. हे सर्व साहित्य एकंदर पावणेचार हजार अशा घसघशीत पृष्ठसंख्येचे आहे. श्री. सुभाष अवचट ( नऊ ग्रंथ ), श्री. शि. द. फडणीस ( तीन ), श्री. अनंत सालकर ( दोन ) व श्री. देवीदास बागूल ( एक ) अशा

अनुक्रमणिका

नामवंत चित्रकारांनी या पंधरा ग्रंथांची मुखपृष्ठे सजवली आहेत. तसेच यापैकी एक ग्रंथ ( 'प्रदेश साकल्याचा' ) पुण्यातील साधना प्रेसने सुरेख छापला आहे. अन्य सर्व, म्हणजे चौदा ग्रंथांना पुण्यातील श्री. चिंतामणी सदाशिव ऊर्फ अण्णासाहेब लाटकर यांच्या कल्पना मुद्रणालयाचे देखणे व कल्पक मुद्रण लाभले आहे. हे पंधरा ग्रंथ असे आहेतः

## ( अ ) ललित वाङ्मय

### ७. वाळवंटातील चंद्रकोर ( एप्रिल १९७७, पृष्ठे डेमी १७५ ) श्रीपाद जोशी

मनमोकळ्या गप्पागोष्टींचे लोभस रूप धारण करणाऱ्या रसाळ प्रवासवर्णनापेक्षा अविकसित देशातील लोकांच्या सांस्कृतिक जीवनाची ओळख करून देणारे माहिती-पूर्ण प्रवासवर्णन लिहावे, या भूमिकेतून लेखकाने अरबी मुलखातील ही मुशाफिरी सादर केली आहे. इस्लामच्या अभ्यासात त्यास विशेष रस असल्यामुळे पश्चिम आशियातील किंवा मध्यपूर्वेतील अरबी, फारसी, तुर्की वगैरे भाषा बोलणाऱ्या जनतेशी भेटता–बोलता यावे अशी त्यांची इच्छा होती. आपण ज्याला सामान्यतः 'अरबस्तान' म्हणतो, त्या प्रदेशातील देशांना लेखकाने १९७६ साली भेट दिली. या पर्यटनात त्याने केलेले लोकजीवनाचे अवलोकन व त्यातून अवतरलेले त्याचे समाजचिंतन जेवढे हृद्य आहे, तेवढेच ते उद्बोधकही आहे.

### ८. पूर्वरंग ( आ. ३ री, डिसें० ७८, पृष्ठे डेमी २८७ ) – पु. ल. देशपांडे

पूर्वेच्या झपाट्याने बदलणाऱ्या कौतुकाचे रंग पाहात १९६२ साली जानेवारी ते मे महिन्यात देशपांडे दांपत्याने प्रवास केला. 'यात्रा सफल झाली की मावंदे घालायचे.' अक्षरांचे धन असलेल्या लेखकाने घातलेले ग्रंथाचे हे मावंदे आहे. प्रवासाच्या संकीर्तनातील लेखकाचा हा पूर्वरंग अपूर्व रंगला आहे.

### ९. रानमेवा ( सप्टेंबर ७८, पृष्ठे क्राऊन १३२ ) – व्यंकटेश माडगूळकर

ना. धों. महानोरांच्या 'रानातल्या कविता' आणि व्यंकटेश माडगूळकरांचा 'रानमेवा' यांची जातकुळी एकाच अस्सल पातळीवरची आहे. निसर्ग आणि मानव यांच्यातील सूक्ष्म–तरल भावबंध त्यातून हळुवारपणाने पण नेमकेपणाने व्यक्त झाले आहेत. 'सहज चालणेही तुझे, सहज पाहणेही तुझे...मोहिनी मज घालते' अशी सहज-सुंदर गद्यशैली या 'रानमेव्या'ची रुची वाढविते.

### १०. पुणेरी ( मार्च १९७८, पृष्ठे डेमी १५५ ) श्री. ज. जोशी

तद्दन जोशी मंडळींचे मराठी ललित वाङ्मय खास सदाशिव पेठीच असते. (य. गो., चिं. वि., महादेवशास्त्री, श्री. ज.... हे सारे एकाच माळेचे मणी !) 'पुणेरी' या एकवीस लेखांच्या प्रस्तुत संग्रहात श्री. जं. नी पुण्यातल्या कनिष्ठ मध्यम वर्गीयांच्या हर्षखेदांना शब्दरूप दिले आहे. या समाजातील सामाजिक परिवर्तनाचाही वेध त्यांनी डोळसपणे घेतला आहे. त्यांच्या प्रसन्न, ताज्या, खुसखुशीत आणि निकोप जीवन-दृष्टीचा लोभस प्रत्यय या संग्रहात येतो.

### ११. काही आंबट, काही गोड ( फेब्रु. ७९, पृष्ठे डेमी १४. ) शकुंतला परांजपे

आयुष्य कंठीत असता अवतीभोवतीच्या गमती वेचून त्यापैकी निवडक बावीस आठवणींचा झेला शकुंतलाबाईंनी येथे गुंफला आहे. वास्तुचित्रे, प्राणिचित्रे, स्मृति-चित्रे आणि व्यक्तिचित्रे अशी विविधता येथे रंगली आहे. निर्भय पण प्रांजल कथन, तसेच साधी पण चटकदार भाषा ही त्यांची वैशिष्ट्ये पानोपानी जाणवतात.

## ( आ ) साहित्यसमीक्षा

### १२. दलित साहित्य : वेदना व विद्रोह ( डिसें. ७७, पृष्ठे डेमी २२६ ) भालचंद्र दिनकर फडके

अर्वाचीन मराठी साहित्याच्या समीक्षकांत डॉ. भा. दि. फडके यांनी आपल्या रससिद्ध वाणीने आणि मर्मस्पर्शी लेखणीने विशेष लौकिक संपादन केला आहे. मराठी कथेवरील त्यांचा प्रबंध-ग्रंथ प्रकाशनाच्या वाटेवर आहे. दलित साहित्याची समीक्षा करणाऱ्या ग्रंथसंपदेत प्रा. रा. ग. जाधवांच्या 'निळी पहाट' बरोबरच डॉ. फडके यांच्या प्रस्तुत भाष्य-ग्रंथाचा निर्देश करावा लागेल. दलित साहित्याची अनेक अंगांनी मीमांसा करून, त्यातील काव्य-कथा-कादंबरी अशा प्रमुख वाङ्मयप्रकारांतील साहित्य-निर्मितीची प्रत्यक्ष समीक्षाही त्यांनी येथे साधार आणि सोपपत्तिक पद्धतीने केली आहे. दलित साहित्याची बलस्थाने आणि शबलस्थाने यांचा वेध घेणारा हा अभ्यास विशेष लक्षणीय आहे.

### १३. ग्रंथवेध ( मे १९७८, पृष्ठे डेमी २८३ ) वि. रा. करंदीकर

आजच्या पिढीतल्या मराठीचा प्राध्यापकांत डॉ. विनायक रामचंद्र करंदीकरांना अग्रस्थान दिले पाहिजे. 'वामन पंडितांची यथार्थदीपिका' व 'भगवद्गीतेचे तीन टीकाकार' ह्या दोन प्रभाणग्रंथांनंतर प्रस्तुत ग्रंथसमीक्षासंग्रह त्यांनी सादर केला

आहे. ' चक्रपाणी ' ( रा. चिं. ढेरे ), ' भागवतोत्तम संत एकनाथ ' ( शं. दा. पेंडसे ), ' मूळ गीतेचा शोध ' ( – ग. श्री. खैर ), ' रामदासः वाङ्मय आणि कार्य ( –न. र. फाटक ) ' केसरीची त्रिमूर्ती ( पु. ग. सहस्रबुद्धे ), ' माधवराव पटवर्धन वाङ्मय-दर्शन ' ( सु. रा. चुनेकर ) ' वि. दा. सावरकर. एक चिकित्सक अभ्यास ' ( –प्र. ल. गावडे ) इत्यादी चौदा गाजलेल्या ग्रंथांचा सविस्तर परामर्श या संग्रहात करंदीकरांनी घेतला आहे. त्या निमित्ताने धर्म, तत्त्वज्ञान व साहित्य, तसेच मध्ययुगीन संतांचे व प्रबोधन युगातील विचारवंतांचे कार्य या विषयांची चर्चा येथे समर्थपणे केलेली आहे. निर्भिड पण सहृदय ग्रंथसमीक्षेचा हा वस्तुपाठ केवळ अपूर्व आहे.

### १४. प्रदेश साकल्याचा ( जाने. ७९, पृष्ठे डेमी १८४ )
### त्र्यं वि. सरदेशमुख

' तेच पतित की जे आखडिती प्रदेश साकल्याचा ' अशी केशवसुतांच्या ' नवा शिपाया 'ची गर्जना आहे. साकल्याच्या प्रदेशापासून आणि सत्याच्या आकलनाहून सौंदर्यानुभव वेगळा काढता येत नाही, अशा प्रामाणिक निष्ठेने बोलणारी ही समीक्षा अभ्यासकाला आवडेल. साहित्याचा व समीक्षेचा जीवनाशी असलेला विविधांगी संबंध शोधण्याचा हा यत्न आहे. कलाकृतीप्रमाणेच तिची समीक्षाही वाचकाच्या जाणिवेला कशी संपन्न करते, साहित्याचे नवेपण व सनातनत्व कोणत्या गुणलक्षणांत् असते, इत्यादी मूलभूत प्रश्नांचा मूलगामी विचार लेखकाने येथे मांडला आहे.

' अंधारयात्रा ' व ' गडकऱ्यांची संसार नाटके' या सरदेशमुखांच्या प्रबंध–ग्रंथां-प्रमाणेच त्यांचा प्रस्तुतचा ' प्रदेश साकल्याचा ' हा समीक्षा-ग्रंथ मराठी टीकेला वेगळे परिमाण प्राप्त करून देईल.

## ( इ ) संशोधन

### १५. सार्थ श्रीज्ञानेश्वरी ( ऑगस्ट ७७, पृष्ठे डबल क्राऊन ९५१ )
### संपा. म. शं. गोडबोले

ज्ञानेश्वरीची सार्थ व सटीक संपादने आजवर अनेक झाली, पुढेही ती होतील; व्हायला हवीतच. ज्ञानेश्वरीतील ओव्यांच्या व शब्द–संहतीच्या विवरणाविषयी प्रस्तुत आवृत्तीच्या संपादकांची एक विशिष्ट धारणा आहे. त्या धारणेच्या दिशेने त्यांनी केलेला हा अर्थ-प्रवास आहे. ( त्यात ' प्रयास 'ही आहे ! ) आपल्या बुद्धीप्रमाणे त्यांनी ज्ञानेश्वरीतील ओव्यांचे अर्थ केले आहेत. ' साहित्यक्षेत्रातील सौंदर्य अनुभव-ण्यास शब्दज्ञान अत्यंत आवश्यक आहे, ' ही संपादकांची श्रद्धा, ' शब्देविण संवा-दिजे ' असे प्रतिज्ञोत्तर मांडणाऱ्या ज्ञानेश्वरीच्या संदर्भात कितपत पुरेशी व सयुक्तिक

आहे, हा मतभेदाचा प्रश्न ठरेल. त्यामुळेच त्यांचा 'सहा वर्षांचा हा श्रमसंभार' कसा कारणी लागेल, याची चिंता वाटते.

## १६. मुरारिमल्लविरचित बाळक्रीडा (जून ७७, पृष्ठे डेमी ११२) संपा. रा. चिं. ढेरे व मो. मा. वाळिंबे

महानुभावीय कवी मुरारिमल्ल याचे 'बाळक्रीडा' हे सोळाव्या शतकातील अप्रकाशित काव्य साठ पानांच्या सर्वंकष प्रस्तावनेसह व सत्तावीस पानांच्या अर्थ-टीपांसह येथे नेटकेपणाने सादर केलेले आहे. संहिता-संपादन हे संशोधनाच्या पातळीवर कसे व केव्हा जाऊ शकते, याचे प्रत्यंतर येथे येईल.

## १७. संतसाहित्य आणि लोकसाहित्य (जुलै ७८, पृष्ठे डेमी २१६) रा. चिं. ढेरे

सुविख्यात संशोधक आणि संत वाङ्मयाभ्यासक डॉ. रामचंद्र चिंतामण ढेरे यांनी प्रस्तुत ग्रंथाच्या रूपाने एक अमोल उपायन अभ्यासकांच्या हाती ठेवले आहे. संत-साहित्य व लोकसाहित्य यांतील अनुबंध, लोकतत्त्वीय अध्ययनदृष्टी, गुरुगौरवांचे गूढ, गुरुसंस्थेचे क्रांतिकार्य, नाममहतीचा मूलस्रोत इत्यादी महत्त्वाचे विषय, परिशिष्ट, अध्ययनसामग्री व संदर्भसूची यांचा परिपूर्ण प्रपंच येथे मांडलेला आहे.

## १८. लज्जागौरी (जून ७८, पृष्ठे डेमी २२८) रा. चिं. ढेरे

डॉ. ढेरे यांचा हा अफलातून ग्रंथ आदिमातेच्या स्वरूपावर व तिच्या उपासनेवर साधार व सचित्र प्रकाश टाकतो. ग्रंथविषय व त्यांची मांडणी सर्वस्वी अभिनव आहे. जोगुलांबा, मातंगी, अंबुवाची, कुंभप्रतीक, जोतिबा, सुब्रह्मण्य, अदिती इत्यादी विषयांच्या सूक्ष्म-साधार विवेचनातून आदिमातेची प्राचीनता येते उलगडून दाखवलेली आहे. 'लज्जागौरी' हा कल्पनाबंध विशद करताना लेखकाने समग्र शास्त्र-दृष्टीचा अवलंब केला आहे; पण त्याचवेळी सौंदर्यदृष्टीलाही तो पारखा झालेला नाही. लज्जागौरी ही सर्जनाची देवता सर्जनेंद्रियाच्या रूपातच पूजिली जाते. तिची मूर्ती हेच विश्वाचे गर्भगृह ठरते. त्या गर्भगृहाच्या दाराशी उभे राहून मातृतत्त्वाचे रहस्य उकलण्याच्या लेखकाने केलेला हा प्रयत्न अवघड असूनही सफल झाला आहे.

## १९. शोध : बाळ–गोपाळांचा (जून ७७, पृष्ठे डेमी २२६) य. दि. फडके

इ. स. १८८० ते १८९५ या पंधरा वर्षांच्या काळातील सामाजिक-राजकीय घटनांचा अन्वयार्थ लावणारा हा ग्रंथ वैशिष्ट्यपूर्ण आहे. टिळक-आगरकरांसंबंधी व त्यांच्या काळातील अन्य व्यक्तींसंबंधी लिहिलेले सात शोध-निबंध येथे दिले आहेत. बाळ-गोपाळांचा शोध हा अखेर माणसांचा शोध आहे, ही स्पष्ट भूमिका येथे ठेवलेली

आहे. टिळक-आगरकरांची व्यक्तित्वे, त्यांचे परस्पर-संबंध व त्यांची कामगिरी याविषयीचे आपले निष्कर्ष लेखकाने येथे सप्रमाण मांडले आहेत.

## ( इ ) राजकीय वाङ्मय

या विभागात श्री. वि. स. वाळिंबे यांची दोन पुस्तके समाविष्ट होतात. ती अशी

### २०. बंगलोर ते रायबरेली ( जून ७७, पृष्ठे डेमी २५२)
### २१. रायबरेली व त्यानंतर ( डिसें. ७८, पृष्ठे डेमी १८० )

राजकीय भाष्य-ग्रंथ समर्थपणे लिहिणारे मराठीत एकूण लेखक तीनच आहेत श्री. दि. वि. गोखले, श्री. वि. ग. कानिटकर ऊर्फ 'रा. म. शास्त्री' आणि श्री वि. स. वाळिंबे. हे तिघेही शीघ्र गतीचे व सिद्धहस्त लेखक आहेत.

इंदिरा गांधींचे राजकीय व्यक्तित्व हे जेवढे वादळी, तेवढेच वादग्रस्त आहे. बंगलोर–रायबरेली–चिकमंगळूर हा त्यांच्या राजकीय कारकीर्दीचा प्रवास एकंदर चारशेबत्तीस पानांच्या मर्यादेत लेखकाने वर्णिला आहे. व्यक्तित्वचित्रणाचा हा आलेख अनेक चढउतारांनी युक्त आहे; त्यातील रेषांचे जाळे जटिल आहे. पण त्याचा सप्रमाण उलगडा करून लेखकाने प्रियदर्शिनी इंदिरेच्या व्यक्तित्वावर प्रकाश टाकला आहे. १९५७ पासून १९७७ पर्यंतच्या दोन दशकांत भारतीय राजकारणाचे चित्र कसकसे बदलत गेले याचे साधार, सुसूत्र, व सम्यक चित्रण करणारे हे दोन्ही ग्रंथ राजकीय इतिहासाविषयीच्या ग्रंथसंपदेत मोलाचे ठरतील.

—अशा रीतीने उपरिनिर्दिष्ट पंधरा ग्रंथ केवळ वीस महिन्यांत प्रकाशित करून श्री विद्या प्रकाशनाने मराठी वाचकांची मोठीच सेवा बजावली आहे.

### २२. प्राचीन मराठीतील चरित्रलेखन ( १९७८, पृष्ठे डेमी ३७० )
### व. रा. बोरगावकर

पुण्यातील कॉन्टिनेंटल प्रकाशन संस्थेने प्रा. बोरगावकरांच्या डॉक्टरेटचा हा प्रबंध ग्रंथरूपाने प्रकाशित केला आहे. तेराव्या शतकापासून अठराव्या शतकाच्या अखेरपर्यंतच्या मराठीतील चरित्र-लेखनपरंपरेचा शोध येथे घेतला आहे. धर्मपंथांच्या आश्रयाने झालेले चरित्रलेखन, तसेच संकीर्ण स्वरूपात (बखरी, पोवाडे, स्तोत्रे, आत्मनिवेदने इत्यादींमधून ) झालेले चरित्रलेखन येथे विवेचिले आहे. पारमार्थिक ध्यास, भक्तीचा आविष्कार व आत्मशोधाची तळमळ ही या निर्मितीची प्रेरणा-कारणे आहेत. चरित्रसदृश अशा या सर्व लेखनातील सांप्रदायिक तत्त्वज्ञान, धर्मचर्चा, चमत्कार-कथा, ईशस्तवने, व्यवहारोपदेश इत्यादी गोष्टी दूर करून निखळ चरित्रो-पयोगी साधनसामग्री शोधावी लागते. सत्यासत्यचिकित्सा, चरित्रविषयाची निवड,

स्वभावलेखन, कथनपद्धती, चरित्रलेखनाचे घाट इत्यादी निकषांवर ते साहित्य पारखावे लागते.

डॉ. बोरगावकरांच्या अभ्यासाचा चौफेरपणा विशद करणारी ही भूमिका लक्षणीय आहे. त्यांचा हा ग्रंथ विशेष तोलामोलाचा उतरला आहे. एका मोठ्या आणि महत्त्वाच्या विषयाला न्याय देण्याचा त्यांचा हा प्रयत्न स्तवार्ह आहे.

## २३. जन्मदा : खंड तिसरा ( पृष्ठे रॉयल २८० ) संपा. राजा मंगळवेढेकर

ग्रंथप्रकाशनकाल दिलेला नाही, पण प्रकाशन वर्ष १९७८ आहे. पहिले दोन खंड कै. ग दि. माडगूळकरांच्या सहकार्याने श्री. राजाभाऊ मंगळवेढेकरांनी संपादिले. गदिमा गेले, पण त्यांनी रेखलेल्या वाटेने जाऊन राजाभाऊंनी एकट्यांनीच हा तिसरा खंड सिद्ध केला आहे. 'मातृश्री माईसाहेब पारखे विश्वस्तनिधी'च्या वतीने सौ. कमलाबाई म. पारखे यांनी हा खंड प्रकाशित केला आहे. रजनी फणसळकरांची सजावट, व्ही. एन्. ओके यांची रेखाचित्रे व पुण्यातील पेपको प्रेसची छपाई यामुळे ग्रंथ देखण्या स्वरूपात प्रसिद्ध झाला आहे.

वैचारिक आणि ललित अशा दोन विभागांत हा खंड संपादिलेला आहे. 'कैकयी' (—बा. भ. बोरकर), 'पाली–बौद्ध साहित्यातील मातृ संकल्पना' (—मो. गो. धडफळे), 'भासाची आई' (—राम शेवाळकर), 'नामदेवांची माउली' (—है. वि. इनामदार) इत्यादी आठ लेख वैचारिक विभागात दिलेले आहेत.

ललित विभागात सोपानदेव चौधरी, ना. ग. गोरे, अनंत काणेकर, वसंत कानेटकर, सरोजिनी बाबर, भीमराव कुलकर्णी, केशव मेश्राम, संजीवनी मराठे, वि. स. पागे, गोपीनाथ तळवलकर प्रभृती सिद्धहस्त साहित्यिकांनी आपापल्या मातांची भावसुंदर व्यक्तिचित्रे रेखाटली आहेत.

संपादन साक्षेपी आहे व ग्रंथ संग्राह्य आहे.

## २४. प्रबोधनातील पाऊलखुणा –गं. बा. सरदार यांचे निवडक लेख ( १९७८, पृष्ठे डेमी १५० ) संपा. नि. जि. फडकुले

महाराष्ट्रातील एक अग्रगण्य विचारवंत आणि ज्येष्ठ साहित्यिक प्रा. गं. बा. सरदार यांच्या निवडक लेखांचा हा संग्रह पुण्यातील कॉन्टिनेन्टल प्रकाशन संस्थेने प्रसिद्ध केला आहे. 'एक समाजहितैषी विचारवंत' ही प्रा. सरदारांची प्रतिमा स्पष्टपणे उभी राहावी, या दृष्टीने त्यांच्या समग्र साहित्याचे आलोडन करून, एक नेटके संपादन डॉ. निर्मलकुमार फडकुले यांनी यशस्वी रीतीने सादर केले आहे. ज्ञानदेव–तुकारामादी संत, आगरकर–शिंदे–फुले यांसारखे समाजसुधारक, राजर्षी शाहूंसारखे दलितोद्धारक राजे यांच्या विचारआचारांचे अनन्यसाधारण महत्त्व विशद

करणारे लेखन येथे एकत्रित स्वरूप वाचायला मिळते. डॉ. फडकुले यांची विचार-परिप्लुत प्रस्तावना, प्रा. सरदारांची मुलाखत व संदर्भ–टीपा यामुळे ग्रंथाची उपयुक्तता वाढली आहे.

## २५. 'विचार और विवेचन (हिंदी)—वा. के. लेले

'क्षेमेंद्राचा औचित्यविचार' आणि 'भारतीय काव्यशास्त्राची उत्क्रांती' या आपल्या दोन ग्रंथांमुळे वाराणसीचे डॉ. वामन केशव लेले जाणकारांना पूर्वपरिचित आहेत. साहित्याच्या अंगोपांगांची तत्त्वचर्चा करणारे त्यांचे स्फुट लेख असे या ग्रंथाचे स्वरूप असून, वाराणसीच्या 'चौखंबा सुरभारती प्रकाशन' संस्थेने तो सादर केला आहे. (प्रथमावृत्ती, मार्च १९७९, पृष्ठे डेमी १५५, मूल्य पंधरा रुपये.)

प्राचीन साहित्यिक वाद, दण्डीचे काव्यलक्षण, भाविक अलंकार, प्राचीन शास्त्र-ग्रंथांची रचनाशैली, साहित्यिकांच्या मनातील साहित्यसौंदर्य इत्यादी तेरा महत्त्वपूर्ण विषयांवरील लेखकाचे सूक्ष्म विचार येथे वाचायला मिळतात. एका मराठी ग्रंथकाराचे हिंदी गद्यशैलीवरील असाधारण प्रभुत्वही येथे प्रत्ययास येते.

## २६. चक्रपाणी : एक विश्लेषण — महन्त आराध्य मुरलीधरशास्त्री व प्रा. कन्हैया कुंदप

क्राऊन ११८ पानांचे हे पुस्तक जुलै १९७८ मध्ये महंत आराध्य मुरलीधरशास्त्री यांनी भुसावळ येथील म्युनिसिपल पार्कजवळच्या श्रीकृष्णमंदिर–केंद्रातर्फे प्रकाशित केले आहे. मूल्य सहा रुपये आहे. एका ग्रंथावरील प्रतिक्रिया म्हणून हा ग्रंथ प्रसिद्ध झाला आहे. डॉ. रा. चिं. ढेरे यांच्या 'चक्रपाणी' या गाजलेल्या प्रबंध-ग्रंथातून महानुभाव पंथाविषयी काही मते मांडलेली आहेत. त्या मतांचा 'परखड परामर्श' घेण्यासाठी हे 'विश्लेषण' सादर करण्यात आले आहे. डॉ. ढेरे यांनी महानुभाव-विषयक स्वतःच्या विवेचनात 'सत्याचा अपलाप' केला आहे, असा प्रस्तुत 'विश्लेषण'-कारांचा दावा असून त्यांनी तो साधार व सुसंगत स्वरूपात मांडला आहे. 'महानुभाव साहित्याबद्दल आस्था असणाऱ्या सर्व वाचकास' हे पुस्तक सादर अर्पण केलेले आहे.

महानुभाव साहित्यबद्दल ज्यांना आस्था आहे, पण अंधश्रद्धा मात्र नाही, त्यांनी काय करावयाचे याचे उत्तर येथे नाही. त्यामुळे डॉ. ढेरे यांचा मूळ ग्रंथ व त्यावरील हा विश्लेषण-ग्रंथ या दोहोंतील प्रतिपाद्ये तपासून पाहून निष्कर्ष सांगणे हे जाणकारांचे काम अजून उरले आहे.

## २७. कवी चोंभा-विरचित उखाहरण-संपा. यू. म पठाण

मराठवाडा विद्यापीठाने मार्च १९७७ मध्ये हे प्रतिष्ठा-प्रकाशन पस्तीस रुपयांना उपलब्ध करून दिले आहे. त्या विद्यापीठातील मराठीचे विभागप्रमुख आणि प्राचीन मराठीचे ख्यातनाम संशोधक डॉ. यू. म. पठाण यांनी 'उखाहरण' काव्याची संहिता उत्कृष्ट स्वरूपात येथे सादर केली आहे. १२६ पानांची सर्वंकष प्रस्तावना ('अंतरंग), २०५ पानांची काव्यसंहिता व १०० पानांची परिशिष्टे व शब्दसूची असा सव्वाचारशेहून अधिक पानांचा हा ग्रंथराज सुरेख स्वरूपात सिद्ध झाला आहे.

काव्याचा वाङ्मयीन, सामाजिक व भाषिक अभ्यास विस्ताराने व साधार मांडणारी प्रस्तावना आणि संशोधित पाठावृत्ती हे या ग्रंथाचे विशेष आहेत. महाराष्ट्र सारस्वताचे आदिपर्व निश्चित करताना डॉ. पठाणांच्या मताची दखल घेणे आवश्यक ठरावे; अशा तोलाचे विवेचन त्यांनी मांडले आहे.

## २८. अर्वाचीन महाराष्ट्र : सांस्कृतिक दर्शन—प्र. न. जोशी

पुण्यातील 'नरेंद्र प्रकाशन' या संस्थेने डेमी १२२ पानांचे हे पुस्तक सप्टेंबर १९७८ मध्ये प्रकाशित केले आहे. महाराष्ट्राच्या सांस्कृतिक जीवनाच्या अंगोपांगांचा सखोल अभ्यास हे डॉ. प्र. न जोशी यांच्या व्यासंगाचे बलस्थान आहे. ग्रंथ आकाराने लहान असला तरी त्यातील संस्कृतिदर्शनाचा पल्ला मोठा आहे.

## २९. उपन्यास : स्थिती और गति ( हिन्दी ) चंद्रकांत बांदिवडेकर

'पूर्वोदय प्रकाशन' (७/८ दरियागंज, नवी दिल्ली २) या संस्थेने डेमी ४१८ पानांचा हा हिंदीतील ग्रंथराज फक्त पंचवीस रुपयांना उपलब्ध करून दिला आहे. डॉ. चंद्रकांत बांदिवडेकर स्वतः 'हिंदी आणि मराठी सामाजिक कादंबरी—वाङ्मयाचा तुलनात्मक अभ्यास' सादर करून पीएच. डी झाले. या दोन्ही भाषांतून त्यांचे सकस समीक्षा-लेख वेळोवेळी प्रसिद्ध झाले आहेत.

वात्स्यायनकृत 'नदी के द्वीप' पासून प्रारंभ करून वीरेंद्रकुमार जैन यांच्या 'अनुत्तर योगी' या कादंबरीपर्यंतच्या हिंदीतील गाजलेल्या सव्वीस कादंबऱ्यांचा परामर्श लेखकाने येथे साधार व सूक्ष्म पद्धतीने घेतलेला आहे. हिंदी कादंबरीचा उद्गम व विकास हे साठ पृष्ठांचे प्रास्ताविक या ग्रंथाची उपयुक्तता वाढविते.

हिंदीतील कादंबरीचा विकासपट विस्ताराने मांडणारा हा ग्रंथ अभ्यासकास उपयुक्त वाटेल.

...अशा रीतीने एकंदर एकोणतीस ग्रंथांचे हे विहंगदर्शन वाचकांना मूळ ग्रंथांचा शोध घेण्यास उद्युक्त करील, असा भरवसा वाटतो.



अनुक्रमणिका

# परिषदवार्ता

## ( २९ ऑक्टोबर १९७८ ते २२ मार्च १९७९ )

---

गेल्या पाच महिन्यात परिषदेतर्फे जे विविध कार्यक्रम झाले, त्याविषयीचे हे संक्षिप्त निवेदन.

**प्रा. फडके यांना श्रद्धांजली :** विख्यात कादंबरीकार प्रा. ना. सी. फडके हे २२ ऑक्टोबर, १९७८ रोजी पुणे येथे वयाच्या चौऱ्याऐंशीव्या वर्षी निधन पावले. त्यांना श्रद्धांजली वाहण्यासाठी भरत नाट्य संशोधन मंदिराच्या सहकार्याने २९ ऑक्टोबर १९७८ रोजी प्रकट सभा भरत नाट्य मंदिरात भरली होती. महापौर श्री. रामभाऊ वडके यांच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या या सभेत श्री. श्री. ज. जोशी, श्री. गोपीनाथ तळवलकर, श्री. ग. वा. बेहेरे, डॉ. वा. पां. बापट, डॉ. रा. शं. वाळिंबे व प्रा. म. वि. फाटक यांची भाषणे झाली. कै. फडके यांची कन्या सौ. अंजली हिने कुटुंबियांतर्फे कृतज्ञता व्यक्त केली. शेवटी श्री. म. श्री. दीक्षित यांनी श्रद्धांजलीचा ठराव वाचून दाखविल्यावर सर्वांनी उभे राहून कै. फडके यांना श्रद्धांजली वाहिली.

**म. फुले पुण्यतिथी :** दि २८ नोव्हेंबर १९७८ रोजी पुण्यातील 'महात्मा जोतिबा फुले मंडळा'च्या सहकार्याने परिषदेने म. फुले यांची पुण्यतिथी साजरी केली. या प्रसंगी प्रथम मंडळाने दिलेल्या, म. फुले यांच्या तैलचित्राचे अनावरण पुणे विद्यापीठाचे कुलगुरु डॉ. राम ताकवले यांच्या हस्ते झाले. नंतर प्रा. ना. स. फरांदे, डॉ. राम ताकवले व अध्यक्ष प्रा. गं. बा. सरदार यांची समयोचित व विचारप्रवर्तक भाषणे झाली. श्री. गो. मा. डोमाळे यांनी म. फुले मंडळाच्या वतीने परिषदेचे आभार मानले.

**माधव जूलियन स्मृतिदिन :** दि. २९ नोव्हेंबर १९७८ रोजी येणारा कै. माधव जूलियन स्मृतिदिन थोड्या वेगळ्या पद्धतीने साजरा करण्यात आला. डॉ. द. न. गोखलेकृत 'डॉ. पटवर्धन ऊर्फ माधव जूलियन' या चरित्रग्रंथावर लेखकाच्या उपस्थितीत प्रकट चर्चा झाली. श्री. मो. रा. वाळंबे, श्री. गोपीनाथ तळवलकर, डॉ. अनुराधा पोतदार, डॉ. प्र. न. जोशी, प्रा. स. शि. भावे प्रभृतींनी या चर्चेत भाग

अनुक्रमणिका

घेतला होता. चर्चेतून उद्‌भवलेल्या काही प्रश्नांचे डॉ. गोखले यांनी लेखक म्हणून स्वतःच्या भूमिकेतून स्पष्टीकरण केले. चरित्रविषय आणि चरित्रग्रंथ या दोन्ही संबंधी झालेला साहित्यचर्चेचा हा कार्यक्रम श्रोत्यांना अभिनव वाटला व आवडला. परिषदेच्या 'अभिप्राय' या मासिक ग्रंथपरिचयात्मक विभागातर्फे प्रस्तुत कार्यक्रमाची आखणी करण्यात आली होती.

**प्रा. जोग स्मृतिदिन :** कै. प्रा. रा. श्री. जोग यांचा स्मृतिदिन १७ फेब्रुवारी १९७९ रोजी, कै. जोग स्मारक समितीच्या सहकार्याने व्हीनस प्रकाशन संस्थेच्या आवारात साजरा करण्यात आला. या प्रसंगी परिषदेचे उपाध्यक्ष डॉ. वि. रा. करंदीकर यांनी दोन्ही संस्थांच्या वतीने प्रास्ताविक भाषण केल्यावर प्रा. गो. म कुलकर्णी यांचे 'संतसाहित्य आणि आधुनिक समीक्षा' या विषयावर विचारपरिप्लुत भाषण झाले. कार्याध्यक्ष श्री. श्री. ज. जोशी यांनी आभार मानले. कै. जोग यांच्या कुटुंबियांतर्फे परिषदेला त्यांचे एक तैलचित्र देण्यात येणार आहे. प्रसिद्ध चित्रकार श्री. व्ही. एस. कुलकर्णी यांनी हे चित्र तयार केले आहे.

**कै. अमरशेख छायाचित्र अनावरण :** शाहीर अमरशेख यांच्या छायाचित्राच्या अनावरणाच्या निमित्ताने परिषदेत ४ मार्च १९७९ रोजी सुप्रसिद्ध कवी श्री. नारायण सुर्वे यांचे 'अमरशेख : कार्य आणि कवित्व' या विषयावर सुरेख भाषण झाले. लोकनाट्याला नवे वळण लावण्यात अमरशेख यांची कामगिरी केवढी मोठी आहे, याचे सुर्वे यांनी साधार विवेचन केले. प्रा. गं. बा. सरदार यांनी समयोचित समारोप केला व शेवटी श्री. मं. श्री. दीक्षित यांनी सर्व संबंधितांचे आभार मानले.

**कै. हमीद दलवाई यांचे छायाचित्र :** मराठीतील एक पुरोगामी लेखक आणि समाज कार्यकर्ते हमीद दलवाई यांच्या छायाचित्राचे अनावरण गुरुवार, दिनांक २२ मार्च १९७९ ला सायंकाळी ६॥ वाजता परिषदेचे अध्यक्ष प्रा. गं. बा. सरदार यांच्या हस्ते झाले. सर्वश्री. वि. ग. कानिटकर, बाबा आढाव, सय्यदभाई, अनिल अवचट इत्यादींची दिवंगत हमीदभाई यांच्यासंबंधी भाषणे झाली. कार्याध्यक्ष श्री. श्री. ज. जोशी यांनी आभार मानले.

**एक स्मृतिदिन :** जुन्या पिढीतील एक खंदे लेखक–संपादक कै. विनायक कोंडदेव ओक यांच्या स्मृत्यर्थ दि. १९ मार्च १९७९ रोजी सौ. लीलावती भागवत यांचे 'बालवाङ्मय आणि मुले' या विषयावर उद्बोधक भाषण झाले. कै. ओक यांचे पणतू श्री. अनंत ओक यांनी परिषदेकडे ठेवलेल्या निधीच्या व्याजाची रक्कम प्रतिवर्षी त्यांच्या स्मृत्यर्थ खर्च करण्यात येत असते.

**'माग्रस'चे स्वागत :** श्री. सुधीर देव यांच्या पुढाकाराने नागपूर व इतरत्र ग्रंथ-प्रसाराचे कार्य गेली अनेक वर्षे चालू आहे. श्री. देव व त्यांचे सहकारी पुणे येथे आले असताना परिषदेने त्यांना सर्वतोपरी सहकार्य दिले. १२ डिसेंबर १९७८ रोजी प्रा.

प्रभाकर ऊर्ध्वरेषे यांच्या अध्यक्षतेखाली परिषदेने मराठी प्रकाशक परिषदेच्या सहकार्याने एक सभा आयोजित केली. या सभेत चित्रकार श्री. शि. द. व सौ. फडणीस यांची विनोदी चित्रकारीसंबंधी मार्मिक भाषणे झाली.

**ना. धारियांची ' सफर ' :** परिषदेच्या ' अभिप्राय ' मार्फत नामदार श्री. मोहन धारिया यांच्या ' सफर ' या राजकीय आत्मचरित्रात्मक ग्रंथावर ४ फेब्रुवारी १९७९ रोजी चर्चा झाली. प्रा. ग. प्र. प्रधान यांनी तासभर भाषण करून ग्रंथाची सर्वांगीण व सटीक ओळख करून दिली. श्री. वि. ग. कानिटकर व श्री. म. श्री. दीक्षित यांनी उपस्थित केलेल्या प्रश्नांचेही त्यांनी निराकरण केले. चालू वर्षी ' अभिप्राय ' तर्फे एकूण सहा ग्रंथांवर चर्चा झाल्या. या कामी डॉ. वि. भा. देशपांडे यांचे विशेष सहकार्य लाभले.

**ग्रंथपारितोषिके :** काही देणगीदारांनी दिलेल्या ठेवरूप निधीच्या व्याजातून प्रतिवर्षी काही ग्रंथपारितोषिके परिषदेतर्फे देण्यात येतात. गतवर्षातील पुढील पुस्तकांना ही पारितोषिके मिळाली आहेत. ' तळ्यातल्या सावल्या ' ( कविता ) प्रा. पुरुषोत्तम पाटील, रु. १०० ( कै. ह. स. गोखले स्मृत्यर्थ ) ' महाराष्ट्राचा देव्हारा '––डॉ. रा. चिं. ढेरे, विश्वकर्मा साहित्यालय, पुणे आणि ' मोकळं आकाश '––श्री रवींद्र पिंगे, प्रेस्टीज प्रकाशन, पुणे या ग्रंथांच्या प्रकाशकांना रु. १०० विभागून ( कै. अ. स. गोखले, ' रत्नाकर'चे संपादक यांच्या स्मृत्यर्थ ) ' निळी पहाट, ' प्रा. रा. ग. जाधव यांना उत्कृष्ट ललितेतर ग्रंथासाठी रु. १५० चे ( कै. विश्वनाथ-पार्वती गोखले स्मृत्यर्थ. )

याशिवाय १९७२ पासून उत्कृष्ट कादंबरीस कै ह. ना. आपटे स्मृत्यर्थ दिली न गेलेली वार्षिक रु. १००–ची पारितोषिके पुढील कादंबऱ्यांना मिळाली–निष्पर्ण वृक्षावर भर दुपारी ' ( ह. मो. मराठे ), ' मुंबई दिनांक ' ( अरुण साधु ), ' सात सक्कं त्रेचाळीस ' ( किरण नगरकर ) ' बिढार ' ( भालचंद्र नेमाडे ) ' शहेनशहा ' ( ना. सं. इनामदार ) ' रघुनाथाची बखर ' ( श्री. ज. जोशी ) ' उच्छाद ' ( त्र्यं. वि. सरदेशमुख ). पारितोषिक–धारकांचे मनःपूर्वक अभिनंदन.

वरील पारितोषिकांची निवड करण्याचे कामी डॉ. हेमंत वि. इनामदार, प्रा. सौ. ललिता कुंभोजकर, प्रा. सौ. अंजली सोमण, प्रा. न. म. जोशी, प्रा. वसंत मिरासदार य. गो. तथा दादा जोशी आणि श्री. मो. रा. वाळंबे यांचे बहुमोल साहाय्य झाले. परिषद त्यांची फार आभारी आहे.

**पुणे संमेलनाची देणगी :** १९७७ च्या नोव्हेंबरमध्ये बावन्नावे अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन भरले होते. घटकसंस्था या नात्याने परिषदेच्या स्थानिक पदाधिकाऱ्यांनी त्या संमेलनास मनोभावे सहकार्य केले होते. संमेलनाच्या कार्यकारणीची शेवटची सभा डिसेंबर १९७८ अखेर भरली होती. या सभेत मंजूर झाल्याप्रमाणे,

संमेलनाच्या शिलकेतून महाराष्ट्र साहित्य परिषदेला तीन हजार दोनशे रुपयांची उदार देणगी नुकतीच देण्यात आली आहे. या देणगीबद्दल प्रस्तुत संमेलनाचे कार्यकारी मंडळ व पुणे नगर वाचन मंदिर (निमंत्रक संस्था) या संस्थेचे सर्व कार्यकर्ते यांची परिषद फार आभारी आहे. कराड आणि पुणे संमेलनांनी घटकसंस्थेला देणगी देण्याची ही जी प्रथा सुरू केली, ती स्वागतार्ह आहे.

काही इतर घडामोडी : पुणे येथे मार्च १९७९ च्या पहिल्या आठवड्यात पुण्यातील डेक्कन कॉलेजतर्फे एक भाषांतर-सत्र आयोजित केले होते. या सत्रात परिषदेतर्फे प्रा. अ. के. भागवत आणि श्री. श्रीपाद जोशी यांनी प्रतिनिधीत्व केले.

म. सा. पत्रिकेचे संपादक डॉ. हेमंत वि. इनामदार यांचे परिषदेच्या सोलापूर शाखेतर्फे दि. ४ मार्च १९७९ रोजी सोलापूरला 'दीनांचा सोयरा पांडुरंग' या विषयावर व्यासंगपूर्ण व रसाळ व्याख्यान झाले. या निमित्ताने तेथील कार्यकर्त्यांसमवेत डॉ. इनामदारांनी परिषदेच्या कार्यविस्तारासंबंधी उपयुक्त चर्चा केली.

विद्यापीठ पातळीवरील आदर्श शिक्षक म्हणून डॉ. हेमंत वि. इनामदार यांना २६ जानेवारी १९७९ रोजी राज्य पुरस्कार जाहीर झाला. परिषदेच्या पदाधिकाऱ्यांनी डॉ. इनामदारांच्या घरी जाऊन त्या निमित्त त्यांचा सत्कार केला.

## संशोधन–कार्य

परिषदेच्या संशोधन विभागातर्फे 'भाषा व साहित्य : संशोधनपद्धती' हा ग्रंथ (संपादक डॉ. वसंत स. जोशी) सिद्ध झाला आहे. तो ग्रंथ आगामी वर्षात प्रकाशित होईल.

दि. ४ व ५ मार्च १९७९ रोजी या विभागातर्फे अहमदनगर जिल्हा ऐतिहासिक वस्तु संग्रहालयाच्या सहकार्याने 'श्री संत एकनाथ आणि त्यांचा काळ' या विषयावर एक व्याख्यानमाला अहमदनगरला आयोजित केली होती. तिचे उद्घाटन डॉ. वसंत स. जोशी यांनी केले. मालेत डॉ. यू. म. पठाण ('एकनाथांच्या लेखनामागील प्रेरणांचे स्वरूप') प्रा. पां. ना. कुलकर्णी ('एकनाथ आणि मुक्तेश्वर यांचा वैयक्तिक व वाङ्मयीन संबंध') आणि डॉ. स. गं मालशे ('एकनाथकालीन ख्रिस्ती वाङ्मय व त्याचा समकालीन वाङ्मयाशी अनुबंध') यांची भाषणे झाली, प्रि. डॉ. ह. कि. तोडमल यांनी समारोप केला.

चंद्रपूर–संमेलन : जानेवारी १९७९ च्या पहिल्या आठवड्यात विदर्भातील चंद्रपूर येथे अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे त्रेपन्नावे अधिवेशन प्रा. वामन कृष्ण चोरघडे यांच्या अध्यक्षतेखाली भरले होते. त्याचा वृत्तान्त सर्वत्र आलेलाच आहे. संमेलनप्रसंगी मराठी साहित्य महामंडळाची बैठक भरली होती. श्री म. श्री. दीक्षित आणि प्रा. न. म. जोशी हे दोघे परिषदेतर्फे या बैठकीस उपस्थित होते.

अनुक्रमणिका

प्रा चोरघडे यांना हार घालून त्यांचा सत्कार करण्यात आला

**महाराष्ट्रकवी यशवंत यांचे अभीष्टचिंतन :** परिषदेचे ज्येष्ठ कार्यकर्ते महाराष्ट्रकवी यशवंत यांच्या वयाला ९ मार्च १९७९ रोजी ऐंशी वर्षे पूर्ण झाली. कार्याध्यक्ष श्री. श्री. ज. जोशी व कार्यवाह श्री. म. श्री. दीक्षित यांनी यशवंतांच्या घरी जाऊन त्यांचा सत्कार केला व त्यांचे अभीष्टचिंतन केले.

**घटनादुरुस्ती :** परिषदेच्या घटनेत कांही व्यावहारिक दुरुस्त्या घटनादुरुस्ती समितीने व कार्यकारी मंडळाने सुचविल्या होत्या. दि. ३१ डिसेंबर १९७९ रोजी भरलेल्या विशेष साधारण सभेपुढे त्या दुरुस्त्या संमतीसाठी ठेवल्या होत्या. प्रा. गं. बा. सरदार यांच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या या सभेत बहुतेक सर्व दुरुस्त्या, काही किरकोळ बदलांसह संमत करण्यात आल्या. ( मूळ दुरुस्त्या ' पत्रिके 'च्या मागील अंकी छापल्या होत्या. ) प्रा. दे. द. वाडेकर, श्री. वि. त्र्यं. शेटे, डॉ. न. का. घारपुरे श्री. द्वारकानाथ लेले, श्री. ह. बा. शिंदे, डॉ. भीमराव कुलकर्णी, इत्यादींनी चर्चेत भाग घेऊन या कामी चांगले सहकार्य केले. दुरुस्त्यांसह नवीन घटनेची कार्यवाही १ एप्रिल १९७९ पासून करावी असा सभेने शेवटी सर्वानुमते निर्णय केला.

**त्रैवार्षिक निवडणुका :** परिषदेच्या त्रैवार्षिक निवडणुका व्यवस्थितपणे पार पडल्या असून नवे कार्यकारी मंडळ १ एप्रिल १९७९ पासून पुढील तीन वर्षांसाठी अस्तित्वात येईल. या निवडणुका पार पाडण्यासाठी कार्यकारी मंडळाने श्री. व. ह. गोळे ( अध्यक्ष ), श्री. वि. ग. तथा राजाभाऊ माटे आणि डॉ. प्र. चिं. शेजवलकर या तिघांचे निर्वाचन मंडळ नेमले होते. निर्वाचनमंडळाने आपले सर्व काम निःपक्षपातीपणे, दक्षतेने व आत्मीयतेने पार पाडले, याबद्दल परिषद त्यांची ऋणी आहे.

## निरोप :

एप्रिल १९७६ पासून गेली तीन वर्षे यथाशक्ती आम्ही संस्थेची सेवा केली. साहित्य पत्रिकेच्या अंकांमधून या सेवेचा तपशील वेळोवेळी छापला असल्याने त्याची पुनरुक्ती करण्याची आवश्यकता नाही. काही उणिवा, त्रुटी आमचे हातून राहिल्या आहेत, याची आम्हास जाणीव आहे.

आमच्या कार्यकारी मंडळाने काही विशेष गोष्टी केल्या. सभासदसंख्या सुमारे एक हजाराने वाढवून संस्थेची आर्थिक स्थिती सुधारली. दोनशे रुपये देणारे अडीचशे आजीव आणि वार्षिक दहा रुपये देणारे साडेसातशे मिळून ही संख्या आहे. हे सर्व सभासद महाराष्ट्राच्या विविध विभागांतून व विविध सामाजिक स्तरांतून जोडले गेले. याशिवाय देणगीरूपाने सुमारे वीस हजार रुपये मिळविले. यामुळे तीन वर्षांच्या कारकीर्दीअखेर सुमारे सत्तर हजारांच्या रकमेची संस्थेच्या स्थिरनिधीत भर पडली व वार्षिक सात हजार रुपये कायम उत्पन्न साहित्यविषयक कार्यासाठी उपलब्ध झाले.

अनुक्रमणिका

सभासदांकडून अल्पशी ठेव घेऊन ग्रंथ घरी वाचण्याची सोय केल्यामुळे, ग्रंथालयात व पर्यायाने संस्थेत जनसंपर्क सतत वाढत राहिला. ग्रंथालयात तीनचार हजार ग्रंथांची भर पडली. संस्थेतील सेवकवर्गास नव्या वेतनश्रेणी देण्यात आल्या. परगावच्या सभासदांसाठी तिसऱ्या मजल्यावरील अतिथीभवनाला जोडून एका जादा स्वच्छतागृहाची व स्नानगृहाची सोय करण्यात आली. यासाठी झालेला खर्च चालू उत्पन्नातून केला. शारदीय व्याख्यानमाला, 'अभिप्राय' नामक मासिक ग्रंथचर्चा, अन्यभाषिक व अन्यधर्मीय संस्थांशी सहकार्य, संशोधन कार्य, भाषावर्ग, मोडी लिपीवर्ग, घटनेत व्यापक स्वरूपाच्या व व्यवहार्य दुरुस्त्या, निरुपयोगी झालेल्या तळघरांचा, उत्पन्नाची बाब म्हणून केलेला उपयोग, म. फुले, डॉ. आंबेडकर, खि. बाबा पदमनजी, शाहीर अण्णाभाऊ साठे, अमरशेख, हमीदभाई दलवाई इत्यादी थोरांच्या छायाचित्रांचे अनावरण – अशी काही ठळक विधायक कामे सांगता येतील. या सर्व कामांमुळे संस्थेत नेहमीच एक प्रकारचे मोकळे, खेळीमेळीचे वातावरण निर्माण झाले. विविधता व नावीन्य या दृष्टींनी एकूण कार्यक्रम व योजना आखण्यात आल्या होत्या.

तीन वर्षांतील कामाचा हा थोडक्यात वृत्तांत दिला आहे. झालेल्या कामांबद्दल समाधान आणि यत्न करूनही न झालेल्या किंवा अपूर्ण राहिलेल्या कामांबद्दल खंत– दोन्ही व्यक्त करीत आहोत. संस्थेचा हा जगन्नाथाचा रथ ओढताना ज्यांचे ज्यांचे म्हणून सहकार्य लाभले, त्यांच्याविषयी आम्ही कृतज्ञता व्यक्त करतो व नव्या कार्यकारी मंडळाला सर्व सभासदांनी असेच मनोभावे सहकार्य द्यावे, अशी आग्रहाची विनंती करतो.

आपले,

श्री. ज. जोशी ( कार्याध्यक्ष ) मो. रा. वाळंबे ( कोषाध्यक्ष ) वि. ग. कानिटकर, राजा महाजन व म. श्री. दीक्षित ( कार्यवाह )—दि. ३१ मार्च १९७९.

## साभार स्वीकार

श्रीविद्या प्रकाशन, पुणे, यांची प्रकाशने–
**काही आंबट काही गोड** ( लेख ) शकुंतला परांजपे, १५ रु.
**व्हिएटनामचा संघर्ष** – विजय कुवळेकर, १० रु.
**प्रदेश साकल्याचा** ( समीक्षा ) त्र्यं. वि. सरदेशमुख, २५ रु.

# महाराष्ट्र साहित्य परिषद

## मावळते पदाधिकारी व कार्यकारिणी

## ( १९७६–७९ )

**अध्यक्ष**

०१. प्रा. गंगाधर बाळकृष्ण सरदार, पुणे.

**उपाध्यक्ष-त्रय**

०२. डॉ. विनायक रामचंद्र करंदीकर, पुणे.
०३. डॉ. विनायक महादेव कुलकर्णी, पुणे.
०४. प्रा. महादेव नामदेव अदवंत, पुणे.

**कार्याध्यक्ष**

०५. श्री. श्रीकृष्ण जनार्दन जोशी, पुणे.

**कोषाध्यक्ष**

०६. श्री. मोरेश्वर रामचंद्र वाळंबे, पुणे.

**कार्यवाह-त्रय**

०७. श्री. विनायक गजानन कानिटकर, पुणे.
०८. श्री. मधुकर श्रीधर दीक्षित, पुणे.
०९. प्रा. ज. वि. ऊर्फ राजा महाजन, जळगाव.

**पत्रिका-संपादक**

१०. डॉ. हेमंत विष्णु इनामदार, पुणे.

**अन्य दहा सदस्य**

११. डॉ. सखाराम गंगाधर मालशे, मुंबई.
१२. प्रा. कृष्ण बळवंत निकुंब, बेळगाव.
१३. श्री. दत्तात्रय बाळकृष्ण डावरे, अहमदनगर.
१४. डॉ. वसंत सखाराम जोशी, वाई.
१५. डॉ. निर्मलकुमार जिनदास फडकुले, सोलापूर.
१६. डॉ. प्रभाकर लक्ष्मण गावडे, पुणे.
१७. प्रा. मधुकर शंकर वाबगावकर, नागपूर.
१८. प्रा. नरसिंह महादेव जोशी, पुणे.
१९. डॉ. अशोक प्रभाकर कामत, पुणे.
२०. सौ. ज्योत्स्ना के. देवधर, पुणे.

**विश्वस्त**

२१. तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री बाळाजी जोशी, वाई.
२२. ॲड्व्होकेट विश्वनाथ त्र्यंबक शेटे

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

**माहितीपत्रक** ( तक्ता क्र. ४, नियम क्र. ८, )

१. प्रसिद्धिस्थान : महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे–३०.
२. प्रसिद्धिप्रकार : त्रैमासिक.
मुद्रक : श्री. चिंतामणी सदाशिव लाटकर, कल्पना मुद्रणालय, पुणे–३०
राष्ट्रीयत्व : भारतीय
पत्ता : कल्पना मुद्रणालय, सदाशिव पेठ, टिळक रस्ता, पुणे–३०.
३. प्रकाशक : श्री. श्रीकृष्ण जनार्दन जोशी ( कार्यध्यक्ष, म. सा. परिषद, पुणे. ३० )
राष्ट्रीयत्व : भारतीय.
पत्ता : १२६३/१ जंगली महाराज रस्ता, पुणे–४.
४. संपादक : डॉ. हेमंत विष्णु इनामदार
राष्ट्रीयत्व : भारतीय
पत्ता : ' संतोष ', भारतीनिवास कॉलनी, ६०/१५ एरंडवणे, पुणे ४.
५. मालकी : महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे–३०.

मी, श्रीकृष्ण जनार्दन जोशी, असे जाहीर करतो की, उपरिनिर्दिष्ट माहिती बरोबर व खरी आहे.

**श्री. ज. जोशी**
कार्याध्यक्ष, म. सा. परिषद, पुणे–३०

पुणे,
दि. ३० मार्च १९७९

अनुक्रमणिका

## नवे पदाधिकारी व कार्यकारिणी

( दि. १ एप्रिल १९७९ ते ३१ मार्च १९८२ )

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या त्रैवार्षिक निवडणुकीचा रीतसर निकाल दि. २५ मार्च १९७९, रविवार रोजी जाहीर झाला. येत्या तीन वर्षांसाठी पुढील पदाधिकारी व कार्यकारी मंडळ निवडून आले :—

**अध्यक्ष**

०१. प्रा. वसंत शंकर कानेटकर, नाशिक.

**कार्याध्यक्ष**

०२. डॉ. विनायक रामचंद्र करंदीकर, पुणे. (अविरोध)

**उपाध्यक्ष**

०३. श्री. गजानन लक्ष्मण ठोकळ, पुणे.
०४. प्रा. दत्ताराम मारुती मिरासदार, पुणे.
०५ प्रा. महादेव नामदेव अदवंत, पुणे.

**कोषाध्यक्ष**

०६. श्री. पुरुषोत्तम शंकर पतके, पुणे.

**कार्यकारिणीचे सदस्य**

०७. डॉ. वसंत दिगंबर कुलकर्णी, मुंबई. (अविरोध)
०८. श्री. मधुकर श्रीधर दीक्षित, पुणे.
०९. डॉ. आनंद रतन यादव, पुणे.
१०. प्रा. नरसिंह महादेव जोशी, पुणे.
११. श्री. माधव राजाराम कानिटकर, पुणे.
१२. प्रा. वसंत मारुती मिरासदार, पुणे.
१३. प्राचार्य राम शेवाळकर, वणी.
१४. डॉ. दत्तात्रेय तातोबा भोसले, सातारा.
१५. श्री. दत्ता हलसगीकर, सोलापूर.
१६. प्रा. हरी श्रीधर शेणोलीकर, धुळे.
१७. डॉ. वसंत केशव दीक्षित, अहमदनगर.
१८. प्रा. मधुकर विठ्ठल फाटक, ठाणे
१९. डॉ. वसंत लाडोबा सावंत, सावंतवाडी.

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री बाळाजी जोशी (वाई) आणि ॲडव्होकेट विश्वनाथ त्र्यंबक शेटे (पुणे) हे दोघेजण मानद विश्वस्त म्हणून काम पाहतात.

# एकता

संपादक
रामदास कळसकर
प्रा. न. म. जोशी

व्यवस्थापक
व. द. तांत्रे

कार्यालय
१३६५ शुक्रवार
नातूबाग, पुणे २

दूरध्वनी
४४६९५९

न. म. जोशी
४४६८६८

विचार : ज्वलंत, जिव्हाळ्याचे
मांडणी : ललित, शैलीदार
विषय : तुमचे आमचे
वार्षिक वर्गणी, पंचवीस रुपये फक्त
यावर्षी दोन विशेषांक याच वर्गणीत
आंतरराष्ट्रीय बालकवर्षानिमित्त
बहारदार अंक १५ ऑगस्ट
नेहमीचा खुमासदार दीपावली अंक
ऐन दिवाळीत